लेखात सांगितले आहेत.

इथे काही ऐतिहासिक पार्श्वभूमी सांगणे गरजेचे आहे. इस्लामच्या इतिहासात 'खलिफा' किंवा 'खिलाफत' ही लोकशाहीसदृश व्यवस्था आहे. सर्व मुसलमानांना आदर्श असणारे पहिले चार खलिफा आणि गेल्या १४०० वर्षांतील सर्वच खलिफा हे लोकांच्या पाठिंब्यावर खलिफा झालेले आहेत. सामान्य लोकांतील एक चारित्र्यवान माणूस खलिफा तेव्हाच होऊ शकतो, जेव्हा त्याला लोकांचा पाठिंबा असेल. पहिले चार खलिफा असे लोकांनी निवडलेले आहेत. त्यानंतर निर्माण झालेल्या उमय्या आणि अब्बासी या दोन खिलाफतींनासुद्धा लोकांचा पाठिंबा मिळवणे गरजेचे वाटत असे. (लोकांचा पाठिंबा मिळवणे म्हणजे लोकांनी खलिफाशी 'एकनिष्ठ राहण्याची शपथ घेणे.' अशी शपथ लोकांनी घेतली की, खलिफाला लोकांचा पाठिंबा मिळाला, असे समजले जाते.) त्याशिवाय खलिफा कायदेशीररीत्या खलिफा ठरत नसे. हे एक इस्लामचे वैशिष्ट्य आहे. त्यामुळे कोणत्याही खलिफाला लोकांचा पाठिंबा हवा आहे, तसा इस्लामिक स्टेटच्या 'अबू बक्र अल बगदादी' यालासुद्धा लोकांचा पाठिंबा हवा आहे. तो कसा मिळवायचा याचे काही कृतिशील मुद्दे त्यांनी सांगितले आहेत.

पहिला आणि सर्वांत महत्त्वाचा अर्थात हिजरत करून जाणे. पण काही कारणाने हिजरत करून जाणे शक्य नसेल तर, जिथे आहात तिथून खलिफा इब्राहीम (म्हणजेच बगदादी) याला पाठिंबा देण्याच्या सभा आयोजित करून पाठिंबा दिला तरी चालण्यासारखे आहे. मात्र त्या सभा रेकॉर्ड करणे आवश्यक आहे. त्या रेकॉर्ड सोशल मीडियाच्या माध्यमातून जास्तीत जास्त प्रसारित केल्या जातील, याची सोय करणेही गरजेचे आहे. अशा सभा शक्यतो मशीद, मदरसे, इस्लामिक संस्था या ठिकाणी आयोजित कराव्या. अशा रेकॉर्ड केलेल्या सभा इस्लामिक स्टेटपर्यंत पोचतील, अशा व्यवस्था केल्या पाहिजेत. जर अशा सभा आयोजित करून पाठिंबा देणे पोलिसांच्या धाकामुळे शक्य नसेल, तर मुसलमानांनी गुप्ततेच्या सर्व शक्यतांचा वापर करावा आणि आपला पाठिंबा जाहीर करावा.

या सर्व प्रयत्नांमुळे दोन गोष्टी साध्य होतील, एक-बाकीच्या असुरक्षित, घाबरलेल्या इस्लामिक गटांना त्यांनी बळ मिळेल आणि तेसुद्धा आपला पाठिंबा खलिफाला जाहीर करतील. पण महत्त्वाची दुसरी गोष्ट म्हणजे अनेक मुस्लीम गटांनी पाठिंबा दिल्यामुळे 'काफिरांमध्ये' दहशत पसरेल, ते अस्वस्थ होतील. ('दहशतवाद' याचा अर्थच लोकांमध्ये 'दहशत' पसरवणे हा आहे) टोकाच्या शक्यतांचा विचार करून जर यांपैकी काहीही शक्य नसेल, तर मनातून तुम्ही इस्लामिक स्टेटप्रती निष्ठा वाहिली पाहिजे. तुमच्या मनात श्रद्धा पाहिजे, त्या श्रद्धेच्या जोरावर इस्लामिक स्टेट आणि खिलाफत तुमची सुटका करेल.

**दोनच पर्याय : इस्लामिक स्टेट किंवा प्रलय**

'दबिक'च्या दुस-या अंकातील हा दुसरा महत्त्वाचा लेख. या लेखाचे एकूण पाच भाग आहेत. सगळे एकमेकांना सुसंगत असे लेख आहेत. पहिल्या लेखातील मुद्दा आहे, की लोकांना 'स्वतंत्र मताचा अधिकार.' 'स्वतंत्र मताचा अधिकार' ही असत्यावर आधारित विचारसरणी आहे. ती इस्लामला मंजूर नाही, अशा प्रकारचा युक्तिवाद या लेखात केला आहे. 'स्वतंत्र मताचा अधिकार' ही विचारसरणी शिकवते की, आपले मत, जरी ते खरं असले तरी, ते दुस-यावर लादण्याचा कोणालाही अधिकार नाही. अल्लाहनी सांगितलेल्या सत्याला आणि धर्माला ही विचारसरणी लावण्याचे प्रयत्न काही लोक करतात, ते चुकीचे आहे. सामान्य लोकांना वाटतं ते सत्य असू शकत नाही. जे अल्लाहनी प्रेषितांच्या मार्फत त्याच्या पुस्तकात सांगितलं, तेच खरं सत्य असू शकतं. त्यामुळे लोकांनी सत्य मानायचं की नाही, हा प्रश्नच अस्तित्वात नाही. अंतिम सत्याशिवाय दुसरे सत्य मानायचा अधिकार लोकांना नाही. म्हणून 'स्वतंत्र मताचा अधिकार' लोकांना नाही, असा युक्तिवाद पहिल्या भागात केला आहे.

दुस-या भागात पूर्वप्रेषित 'नूह' यांची इस्लामप्रचाराची गोष्ट सांगितली आहे. प्रेषित मुहम्मद यांना ज्याप्रमाणे अल्लाहनी संदेश देण्यासाठी निवडलं, त्याप्रमाणे त्यांच्या-पूर्वी प्रेषित 'नूह' यांनाही संदेश देऊन पृथ्वीवर पाठवले होते. परंतु लोकांनी अल्लाहनी प्रेषित 'नूह'मार्फत पाठवलेलं सत्य मानलं नाही आणि ते 'नूह' यांना त्रास देऊ लागले. त्या वेळी 'नूह' यांनी अल्लाहकडे पृथ्वीवर प्रलय






आणून 'सत्य न मानणा-यांचा' बंदोबस्त करण्याची विनंती केली. त्यानंतर अल्लाहनी 'नूह' यांना एक जहाज बांधायला सांगितलं आणि सर्व प्राणिमात्रांचे नर आणि मादी यांना घेऊन त्या जहाजावर जायला सांगितलं. त्याप्रमाणे प्रेषित नूह यांनी जहाज बांधून पूर्ण केले आणि अल्लाहनी सांगितल्याप्रमाणे सर्व प्राणिमात्रांसमवेत जहाजावर चढले. मग पृथ्वीवर भयंकर प्रलय आला, भूकंप झाले आणि ज्यांनीज्यांनी सत्य नाकारले होते, ते त्या प्रलयामध्ये नष्ट झाले. याचा अर्थ असा की, अल्लाहने प्रेषितांमार्फत पाठवलेले सत्य स्वीकारले नाही तर मृत्यू निश्चित आहे. म्हणजे सामान्य लोकांना स्वतंत्र मताचा अधिकार नाही. हे सांगण्यासाठी 'कुरआन'मधील 'अल्लाहशिवाय कोणाचीही भक्ती करू नका अन्यथा मला भीती आहे की, तुम्हांवर एक दिवस दुःखदायक प्रकोप कोसळेल' (११:२६), या आयतीचा संदर्भ दिला आहे.

प्रेषित नूह यांचे जहाज ही केवळ दंतकथा नाही. 'हादीस'चे ज्येष्ठ संकलक सहिह बुखारी यांनी हादीस नोंदवली आहे कि, 'त्या जहाजाचे अवशेष अल-जुडी या पर्वतावर आहेत आणि इस्लाम निर्माण झाल्यानंतरच्या पहिल्या पिढीतील लोकांनी ते अवशेष पाहिलेसुद्धा आहेत.' असं मानलं जातं की, ते अवशेष अब्बासी खिलाफतीच्या काळापर्यंत अस्तित्वात होते. पुढे ते नष्ट झाले.

'नूह यांचे जहाज' या गोष्टीतून दोन मुद्दे समोर येतात. एक, ज्यांनी सत्य स्वीकारले आहे आणि त्यानुसार आचरण करत आहेत, त्यांची प्रलयाच्या शिक्षेतून सुटका होईल; ज्यांनी स्वीकारले नाही ते नष्ट होऊन जातील आणि दोन, ज्यांची शिक्षेपासून सुटका झाली अशा लोकांची संख्या नेहमी अल्पसंख्य असणार आहे; बहुसंख्य नेहमी नष्ट होऊन जाणार. ही दोन सत्ये कालातीत आहेत. तसेच कोणत्याही काळात जर लोक असं म्हणू लागले की, 'नूह' किंवा इतर प्रेषितांनी सांगितलेले जरी सत्य असले, तरी त्यांना ते सत्य लोकांवर लादण्याचा आधिकार नाही, तर असं जे कोण म्हणतील ते सुद्धा श्रद्धाहीन मानले पाहिजेत, असा प्रेषित 'नूह' यांचा आदेश आहे.

काही लोक असा आरोप करतात की, इस्लामिक स्टेट मुसलमानांवरही हल्ले करत आहे. त्याचा अर्थ ते खरे मुसलमान नाहीतच. खरा मुस्लीम दुस-या मुसलमानावर हल्ले करत नाही. या आरोपावर उत्तर पुढच्या भागात दिले आहे. इस्लामिक स्टेट म्हणतं की, 'केवळ ईश्वर एकमेव आहे तो अल्लाह आणि मुहंमद पैगंबर हे त्याचे शेवटचे प्रेषित', हा जप करून कोणी मुसलमान होत नाही. रोज असा जप करणारे अनेक प्रकारच्या काफिर कृतींमध्ये अडकलेले आहेत. मूळ इस्लामचा प्रेषितांनी शिकवलेला अर्थ समजणारे आज खूप थोडे लोक आहेत. म्हणूनच खरे इस्लामिक स्टेट जे प्रेषितांच्या काळात होते, आदर्श खालिफांच्या काळात होते, पर्शिया आणि रोमविरुद्धच्या जिहादकाळात होते, स्पेनपर्यंत साम्राज्य पसरले त्या उम्मया काळात होते. त्या वेळी मूलभूत विषयांची पायाभरणी झाली होती, त्यामुळे असे खरे इस्लामिक स्टेट निर्माण होऊ शकले. आज मुसलमान बाथ विचार, इहवादी विचार, उदारमतवाद, लोकशाही अशा इस्लामविरोधी विचारांत अडकलेला आहे. म्हणून ख-या आदर्श इस्लामिक स्टेटची निर्मिती करावी यासाठी भरकटलेल्या मुसलमानांवरसुद्धा इस्लामिक स्टेट हल्ले करत आहेत.

शेवटी त्यांनी आवाहन केले आहे की, आदर्श इस्लामिक स्टेटची निर्मिती करायची असेल तर सर्व मुसलमानांना एकत्र येऊन 'स्वतंत्र मताचा अधिकार' या तत्त्वाविरोधात लढावे लागेल.

**सेक्युलर आणि कम्युनिस्ट –**

'दबिक' मासिकातील महत्त्वाचे सदर आहे, इस्लामिक स्टेट रिपोर्ट. या दुस-या अंकात 'कुर्द' या बंडखोर गटाशी झालेल्या लढाईचा वृत्तांत दिला आहे. कुर्द हे धर्माने मुसलमान असले, तरी सुन्नी कम्युनिस्ट आहेत आणि त्यांनी स्वतंत्र कुर्दी कम्युनिस्ट राज्य स्थापन करण्याचे ध्येय ठेवले आहे. या मार्गात ते इस्लामिक स्टेटशी शत्रुत्वाच्या भावनेने वागतात. शिवाय त्यांनी कम्युनिझमसारखी काफिर विचारसरणी स्वीकारली आहे. त्यांच्याशी झालेल्या लढाईचा आणि विजयाचा वृत्तांत या रिपोर्टमध्ये आहे. शेवटी अल्लाहकडे प्रार्थना केली आहे की, अल्लाह या सेक्युलर आणि द्रोही लोकांना सतत असेच अपमानित करत राहो!!

**गोष्ट 'मुबाहलहो'ची –**

प्रेषितानी मदीनेहून मक्केवर आक्रमण केले आणि

मक्का जिंकून घेतली. त्यानंतर त्यांनी 'दायित्वमुक्ततेची घोषणा' केली. त्याचा परिणाम असा झाला की, अनेक ज्यू आणि ख्रिश्चन टोळ्यांनी इस्लाम स्वीकारला. पण त्यातही काही लोकांनी प्रेषितांवर श्रद्धा ठेवण्यास नकार दिला आणि काही ख्रिश्चन टोळ्यांनी प्रेषितांना आपले 'प्रेषितत्व' सिद्ध करण्याचे आवाहन केले. इस्लामचे प्रेषित मुहंमद आणि ख्रिश्चनांचे प्रेषित येशू यांच्यात खरं कोण, असा वाद तयार झाला आणि चर्चा करून प्रश्न सोडवण्याचे ठरले. ही चर्चा 'मुबाहल' येथे झाली. चर्चेतून असे निष्पन्न झाले की, मुहंमदच खरे प्रेषित आहेत. तरी देखील ख्रिश्चन टोळ्यांनी इस्लाम स्वीकारला नाही. तेव्हा जो कोणी खोटा असेल त्यावर अल्लाह स्वतः प्रकोप आणेल, अशा आशयाची आयात अवतरित झाली. 'मुबाहल'च्या गोष्टीचा अर्थ आहे की, इस्लाम आणि बिगरइस्लाम यांच्यात सत्यावरून चर्चा होते आणि त्यात इस्लामचा विजय होतो. हा विजय झाल्यावर पराजित झालेल्यांनी इस्लामचा स्वीकार करणे अपेक्षित आहे.

जबात अल-जवलानी नावाचा एक मुस्लीम गट आहे. तो इस्लामिक स्टेटच्या विरोधात लढतो आहे आणि शरियतच्या ऐवजी माणसांनी निर्माण केलेल्या कायद्यांच्या आधारे राज्य चालवण्याचा त्यांचा हेतू आहे. इस्लामच्या आणि इस्लामिक स्टेटच्या दृष्टीने हा खूप मोठा गुन्हा आहे. त्यांच्या एका नेत्याने इस्लामिक स्टेट वर 'खाजीरींपेक्षा' जास्त आक्रमक असल्याचा आरोप केला होता. म्हणून इस्लामिक स्टेटच्या अबू मुहम्मद अली-अदानी (जो नुकताच अमेरिका-रशिया च्या संयुक्त कारवाईमध्ये मारला गेला असल्याची बातमी आली होती) याने जवलानी यांच्या नेत्यांना 'मुबाहल' (म्हणजे चर्चेसाठी) बोलावलं.

इथे 'खारीजी' म्हणजे काय याचा खुलासा केला पाहिजे. आदर्श खलिफा उस्मान यांनी प्रशासनातील काही अधिकार देताना पक्षपात केला आणि उमय्या कुळातील लोकांना लायकी नसताना अधिकारपदावर बसवले, अशा काही महत्त्वाच्या आरोपांवरून खलिफा उस्मानची मुसलमानांकडूनच हत्या करण्यात आली. (एका मुसलमानाने दुस-या मुसलमानाचे रक्त सांडण्याचा हा पहिलाच प्रकार होता. इस्लाममध्ये यानंतर कायम दुफळी माजली.) उस्मानच्या हत्येमुळे पुढचे खलिफा झाले 'अली'. खलिफा झाल्यानंतर पहिला महत्त्वाचा प्रश्न त्यांना सोडवायचा होता, तो म्हणजे उस्मानच्या मारेक-यांना पकडून शिक्षा करणे. पण खलिफा अली यांना ते जमत नव्हते, म्हणून सिरीयाचा गव्हर्नर अमीर मुविया याने अलीविरोधात लढाईचा पवित्रा घेतला. उमय्या कुळाचा अमीर मुविया आणि चौथे खलिफा अली यांच्यात इस्लामच्या इतिहासातील पहिले गृहयुद्ध झाले. अनेक दिवस लढाईचा कोणताही निकाल लागला नाही. दोन्ही बाजूंची खूप मनुष्यहानी झाली. म्हणून लढाई थांबवून हा वाद सोडवण्यासाठी एका 'लवाद' नेमण्यात आला. हा लवाद जो निर्णय देईल, तो मान्य करणे सर्वांवर बंधनकारक करण्यात आले. त्या लवादाने 'कुरआन'ला साक्षी ठेवून निर्णय द्यावा, असे ठरले. परंतु कोणत्याही वादावर 'कुरआन'चे आधार घेऊन मानव निर्णय देऊ शकत नाही, निर्णय कुरआनचाच असावा लागतो; त्यामुळे अनेक लोकं या लवादावर समाधानी नव्हते. सहा महिन्यांच्या कालावधीनंतर लवादाने निर्णय दिला, तो घटनाबाह्य होता. तो निर्णय अलींच्या पक्षाच्या विरोधी जात होता. म्हणून अलींनी लवादाचा निर्णय न मानता, पुन्हा एकदा मुवियाविरोधात लढाईची तयारी केली. त्या वेळी आधी लवादावर असमाधानी असलेले आणखी दुःखी झाले आणि पूर्वी अलींच्या बाजूने असलेले आता लढाईच्या विरोधात गेले. असे मुस्लीम मुस्लिमांविरोधात लढणार नाही असा पवित्रा घेतलेले म्हणजे 'खारीजी'. खारीजी हा गट अत्यंत आक्रमक आणि मुलतत्त्ववादी होता. असं म्हटलं जातं की, जगाच्या इतिहासातील पहिली मूलतत्त्ववादी होता. असं म्हटलं जातं की, जगाच्या इतिहासातील पहिला मूलतत्ववादी दहशतवादी संघटना म्हणजे 'खारीजी'. मुसलमानी इतिहासकारसुद्धा या गटाला दहशतवादीच संबोधतात. पुढे अलींची हत्या या खारीजींनीच केली.

इस्लामिक स्टेटवर एक इस्लामच्या दृष्टीने धर्मद्रोही ठरलेला एक जबात अल-जवलानी नावाचा गट 'खारीजीं'पेक्षा जास्त आक्रमकपणाचा आरोप करतो आणि तो इस्लामिक स्टेटला मान्य नाही. हे पटवून देण्यासाठीच अल-आदानी याने 'मुबाहल'चे आयोजन केले आहे.

अर्थातच 'मुबाहल'मध्ये नेहमी इस्लाम जिंकत असतो, तसं या चर्चेतही जिंकला. या लेखाचे एकूण सात भाग आहेत. पुढच्या भागात या चर्चा करण्याच्या योग्य पद्धती कोणत्या, याची चर्चा करण्यात आली आहे. त्यासाठी अनेक मुस्लीम विचारवंतांचे संदर्भ दिलेले आहेत.

यानंतर मुजाहिद्दीन (म्हणजे धर्मयोद्धे) म्हणजे नेमके कोण? याची चर्चा केलेली आहे. मुजाहिद्दीन तोच आहे, जो अल्लाहवर आणि त्याच्या प्रेषितांवर संपूर्ण श्रद्धा ठेवतो. ही प्रत्यक्ष अल्लाह किंवा प्रेषितांना न पाहताही ठेवलेली श्रद्धा खूप महत्त्वाची आहे, असे अनेक 'हादीस'मधले संदर्भ देऊन सांगितले आहे. पुढच्या भागांमध्ये 'मुबाहल' बद्दल आणखी खोलात चर्चा केली आहे. त्यासंबंधी तयार होणा-या शंका, त्यांची उत्तरं असं सर्व देऊन शेवटी अल्लाहच्या प्रेषितांच्या धर्माचा कसा विजय होतो, हे स्पष्ट केलेले आहे. वर सांगितलेली 'खारीजी' नावाची संघटना आणि इस्लामिक स्टेट यांची तुलनासुद्धा चुकीची कशी आहे, हेसुद्धा सांगितले आहे. याचा अर्थ इस्लामच्या राजकीय धार्मिक इतिहासातील जे जे आदर्श, त्यांचाच आदर्श इस्लामिक स्टेटने राज्य उभं करताना ठेवला आहे. या सर्वाला विरोध करणारे काफिर म्हणजे कोण असतात, याचेही स्पष्टीकरण देण्यात आले आहे.

शेवटी, ही लढाई कशासाठी आहे, तर प्रेषितांनी निर्माण केलेलं आदर्श खलिफांनी पुढे नेलेलं स्पेनपासून सिंधपर्यंत पसरलेलं जगातील बलाढ्य अल्लाहचे पुस्तक आणि प्रेषितांच्या कृती यांच्याआधारे चालणारे मुस्लीम स्टेट निर्माण करण्यासाठी!! (इथे स्पेन ते सिंध ही केवळ कल्पना आहे. मूळ ध्येय संपूर्ण जग हे मुस्लीम स्टेट करण्याचे आहे) त्यासाठी काफिर यांच्याशी तर लढायचे आहेच; परंतु, जे मुसलमान सेक्युलर आणि काफिरांच्या नादी लागून इस्लामपासून दूर चालले आहेत, त्यांच्याशीसुद्धा ही लढाई आहे.

'दबिक'च्या सर्व अंकांत असणारे 'In The words of Enemy' हे सदर याही अंकात आहे. त्याच्यानंतर इस्लामिक स्टेटने मिळवलेले काही नवीन प्रदेश, त्यांची माहिती आहे. त्यासाठी झालेल्या लढायांची माहिती आहे. 'सहिह मुस्लीम' यांनी संकलित केलेलं एक हादीस आहे, त्यात प्रेषित सांगतात, 'तुम्ही (म्हणजे मुसलमान) अल्लाहच्या मर्जीने एक दिवस अरेबियाचा द्विपकल्प जिंकून घ्याल. त्यानंतर पर्शिया, रोम, शेवटी तुम्ही 'दज्जल' (सैतानाच्या कृती) शी सुद्धा लढाल आणि त्याच्यावर विजय मिळवाल.'

**समारोप**

या अंकाबद्दल माझं निरीक्षण असं आहे की, एकूण विचार सांगण्याची भाषा ही खूप सोपी आहे. कोणत्याही मुसलमानाला जो स्वभावतः धर्मश्रद्ध असतो, त्याला कुरआन आणि हादीसमधले संदर्भ देऊन आकर्षित करण्यासाठी या भाषाशैलीचा उपयोग होत असेल. ज्या वेळी आपण इस्लामचा इतिहास ही संज्ञा वापरतो, त्या वेळी ती केवळ धार्मिक नसते. इस्लाममध्ये धर्म आणि राजकारण वेगवेगळ्या संकल्पना नाहीत. त्यामुळे इस्लामचा इतिहास हा धर्माचाही इतिहास असतो त्याचबरोबर तो राजकीय, सामाजिक, आर्थिक सुद्धा इतिहास असतो. त्यामुळे गेल्या लेखात सांगितल्याप्रमाणे इस्लामिक स्टेटमध्ये मुसलमान कुटुंबांच्या आर्थिक स्थैर्याची काळजी घेतलेली आहे.

सर्व लेखांत संदर्भ वापरताना, ते कोणत्याही विवादास्पद व्यक्तीचे किंवा संस्थेचे वापरलेले नाहीत. सर्व संदर्भ सर्व इतिहासकारांना मान्य होतील, असे आहेत. सर्व मुस्लीम जग ज्या लोकांना मानतं, त्याच विचारवंतांचे संदर्भ वापरलेले आहेत. पुन्हा गेल्या लेखात सांगितल्याप्रमाणे संदर्भ वापरताना मूळ संदर्भाची कुठेही मोडतोड केलेली नाही. कुरआन किंवा हादीसमध्ये तशी मोडतोड करणे हा गुन्हाच मानला गेला आहे, पण इस्लामी तत्त्वज्ञान किंवा शरिया यांचे संदर्भ सुद्धा जसेच्या तसे वापरले आहेत. जर अजूनही कोणाला असे म्हणायचे असेल की, इस्लामिक स्टेट म्हणजे खरा इस्लाम नाही, तर त्याला तसे म्हणू दे; वस्तुस्थिती हेच सांगते की, ख-या आदर्श इस्लामप्रमाणेच चालणारे हे इस्लामिक स्टेट आहे.

CCC

अनुक्रमणिका

# शेती, शेतकरी आणि शासन

लेखांक - ८

श्री. के. वनपाल

१९४७ साली भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर पंचवार्षिक योजना, पंचवार्षिक निवडणुका, नियोजन आयोगाची धोरणे ह्या गोष्टी नेहरूंच्या आणि शास्त्रीजींच्या काळात नियमितपणे चालू होत्या. अणुभट्टीचा उदय, मोठाली धरणे, विजेच्या निर्मितीचे मोठे प्रकल्प हे सारे चालू होते. जनता शांतपणे ते पाहत होती. शेतक-यांच्या समस्यांना चर्चेपलीकडे फारसे महत्त्व दिले जात नव्हते. कारण हिंदुस्थानचे राज्य अजूनही इंग्रजांनी घालून दिलेल्या पठडीप्रमाणेच चालले होते. शासन शेतक-यांच्या फारसे जवळ गेलेले नव्हते.

१९६२ साली महाराष्ट्राचे पहिले मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण संरक्षणमंत्री म्हणून दिल्लीला गेले. त्यानंतर मारुतराव कन्नमवार यांची छोटीशी कारकीर्द झाली. मागून वसंतराव नाईक हे मुख्यमंत्री झाले. त्यांच्या सुरुवातीच्या काळातच महाराष्ट्रात दुष्काळ पडला. त्यानंतर मात्र शेतक-यांच्या प्रश्नांकडे सरकारने गंभीरपणे लक्ष द्यायला सुरुवात केली. हायब्रिड वाणांच्या बियाण्यांची पेरणी केली, तर भरपूर अन्नधान्य निर्माण होईल, या विचाराने वसंतराव नाईकांनी महाराष्ट्रात गावोगावी फिरून हायब्रिड बियाणांचा प्रचार केला. त्या वेळचा माझा अनुभव इथे सांगितला पाहिजे.

अक्कलकोटला तहसिलदार म्हणून तीन वर्षे काढल्यानंतर माझी श्रीगोंद्याचा गटविकास अधिकारी (ग. वि. अधिकारी) म्हणून नेमणूक झाली. तहसिलदारा-पेक्षा ग. वि. अधिका-याचे काम पुष्कळच निराळे होते. तहसिलदाराला फार मोठे अधिकार असतात. तो तालुक्याचा राजाच म्हटला पाहिजे आणि लोकांतही त्याला मान असे. मात्र ग. वि. अधिका-याला पंचायत समितीच्या सभासदांचे राजकीय नाटक सांभाळत विकासाचे काम करावे लागते. असं असलं तरी या जागेवरून आपल्याला शेतक-यांच्या विकासासाठी काही करता येईल, अशी उमेदही वाटत होती.

मी ग. वि. अधिकारी म्हणून दाखल झालो, तोच पंचायत समितीकरवी हायब्रिड बियाण्यांच्या वाटपाचे काम सुरू झाले. प्रत्येक पंचायत समितीकडे बियाण्यांची पाकिटं येत आणि मान्सून सुरू होण्याच्या आत ती पाकिटे प्रत्येक गावात पोचली पाहिजेत, अशी ताकीद असे.

आमच्या पंचायत समितीचे सभापती उत्साहाने कुठल्याही कामात लक्ष घालत असत. आम्ही रोज जीपमधून १०-१२ गावी जाऊन बियाण्यांची पाकिटे वाटत असू. एके दिवशी जीपच्या डायव्हरकडून निरोप आला की, तो आजारी असल्याने येऊ शकणार नाही. मी जीप चालवू शकत असे. पण माझ्याकडे लायसेन्स नव्हते. सभापतींनाही जीप चांगली चालवता येत असे. शिवाय बंद पडलेली जीप दुरुस्त करून पुन्हा चालू करण्याचे कसबही त्यांच्यापाशी होते. पण लायसेन्स त्यांच्याकडेही नव्हता. तरी बियाणेवाटपाचे काम बंद पडू नये, म्हणून आम्ही दोघांनी ड्रायव्हरविना तो कार्यक्रम तसाच चालू ठेवला होता, असे १५ दिवस गेले.

एक दिवस जिल्हापरिषदेकडून (जि. प.) एक अधिकारी पंचायत समितीत दाखल झाला. त्याने मला एक निनावी अर्ज दाखवला. त्या अर्जात म्हटले होते की, ग. वि. अधिकारी आणि सभापती यांनी त्यांच्यापाशी लायसेन्स नसताना पंचायत समितीची (पं. स.) गाडी पं. स. च्या सभापतींच्या खाजगी कामासाठी वापरली.

मला हे सगळेच नवीन होते. मी जे खरे होते ते त्या अधिका-याला सांगितले आणि माझा जबाब त्या अधिका-याने लिहून घेतला हे प्रकरण आपल्यावर थोडे शेकणार अशी धास्ती मला सुरुवातीला वाटली. पण थोड्या दिवसात मी सगळे विसरून गेलो.

पुढे १५-२० दिवसांनी जि. प. चे मुख्य अधिकारी

अनुक्रमणिका






दौ-याच्या निमित्ताने श्रीगोंद्यास आले आणि त्यांनी ह्या निनावी अर्जाचा विषय काढला. ते म्हणाले, "वनपाल, तुमचा खुलासा मी वाचला; पण लायसेन्स नसताना जीप चालवणे चुकीचे आहे, हे तुमच्या लक्षात कसे आले नाही?"

"हो सर, हा मुद्दाच माझ्या ध्यानात आला नाही. आम्हा दोघांनाही जीप चालवता येत होती. कामात खंड पडू नये, म्हणून आम्ही जीप चालवली. ड्रायव्हर खूपच आजारी होता."

"अहो, तात्पुरता ड्रायव्हर नेमायचा. त्याच्यापाशी लायसेन्स आहे की नाही हे पाहून घ्यायचे. तुमची चूक झाली की नाही?"

"हो, तेही चुकलेच. मी मामलेदार होतो, तेव्हा एसटीनेच प्रवास करावा लागायचा. त्यामुळे ही लायसेन्सची अडचण माझ्या ध्यानातच आली नाही."

हे जाबजवाब वाढतच गेले. मुख्य अधिका-यांचे समाधान काही होईना. शेवटी मी त्यांना म्हटले.

"सर, तुम्ही इतके विचारी आणि आदर्श मुख्याधिकारी आहात की, माझ्याविषयी तुमच्या मनात थोडातरी अविश्वास निर्माण झाला असेल, तरी मला कायमचे अपराध्यासारखे वाटत राहील. आपण म्हणत असाल तर मी राजीनामाच देतो. नोकरी करायची तर ती अगदी निष्कलंक राहून करायची, असा माझा संकल्प आहे. तेव्हा देऊ का राजीनामा?"

"अरेरे! तुम्ही फारच इमोशनली हे सगळं घेतलंत. माझ्या चौकशीचा भाग म्हणून हे प्रश्न विचारले. अशा अडचणीत मार्ग शोधायचा असतो, भांबावून जायचं नसतं."

"मग मी काय करू? चूक तर मी कबूलच केली आहे."

"सांगतो. त्याचाही मी विचार करून ठेवलाय. असं पहा, सभापतींविषयीही अर्जात तक्रार आहे की, 'सभापतींनी खाजगी कामासाठी बिगरलायसेन्स गाडी वापरली.' तेव्हा आता आपण सभापतींना म्हणू की, त्यांनी खाजगी कामासाठी गाडी वापरली असं लॉगबुकला दाखवायचं आणि त्या कालावधीचे पैसे त्यांनी पंचायत समितीकडे भरायचे. तसे झाले की, या अर्जाचा निकालच लागेल. आहेत का ते तुमच्या वळणातले?"

"अगदी नक्की. माणूस फार उदार आणि नेकीनं काम करणारा आहे. सभापतींच्या तो-यात ते कधीच नसतात. मी त्यांना तुमच्या समोरच घेऊन येतो."

मी उठून सभापतींच्या केबिनमध्ये गेलो. त्यांना सगळं सांगितलं त्यांना ते पटलंही, "किती पैसे लागतील साधारण?"

"ते नंतर बघू. तुम्ही आधी माझ्या केबिनमध्ये चला आणि 'प्रायव्हेट पर्पज' या शे-याला अनुसरून पैसे भरायला तयार आहे, असं सांगा म्हणजे झालं" – मी

"चला." – सभापती

दोघेही मुख्याधिका-यांसमोर आलो. लॉगबुक मागवलं. २ हजार १० रु. हिशेब झाला. ते पैसे सभापतींनी भरले. मुख्याधिका-यांनी हे प्रकरण स्वतः मिटवले आणि तो अर्ज दप्तरी दाखल केला. जाताना ते म्हणाले की, "वास्तविक अशा निनावी अर्जाची दाखलही घ्यायची नसते. पण हा मार्ग सुरक्षित वाटला म्हणून हे करून घेतलं. पुढे काही असाच अर्ज आला, तर ही तरतूद बरी."

मुख्य कार्यकारी अधिका-यांच्या उदार मनाचा आणि सभापतींच्या दिलदारपणाचाही अनुभव आला.

(१)

काहीकाही विषय फिरूनफिरून आयुष्यात सामोरे येतात, असे वाटते. हायब्रिड ज्वारीच्या पुराणातील पुढचं प्रकरण एका संकटाच्या स्वरूपात माझ्या नशिबात आलं.

हातकणंगल्याला ७४, ७५ साली बदली झाली. त्या वेळी हायब्रिड ज्वारीचा मोठा प्रसार झाला होता. तालुक्याच्या पंचायत समितीच्या सभापतींनी त्यांच्या नरंदे नावाच्या गावात सगळ्या शेतक-यांना हायब्रिड बियाणंच पेरायला सांगितलं. हे सभापती म्हणजे एक अजब रसायन होते. काही खाजगी भांडणातून त्यांनी विरोधकाचा खून केल्याचीही बोलवा होती. त्या खुनाचा बदला घेण्यासाठी त्यांच्या गावच्या वाटेवरील एका गावात दोन मुली पुरुषाचा पोशाख घालून सभापतींची टेहळणी करीत असायच्या, असेही सांगितले जात असे. आम्ही (सभापती आणि मी) जीपमध्ये बसलो की, पाठीमागे दोन बंदूकधारी चढायचे आणि मगच प्रवास सुरू व्हायचा. फिरतीचा कार्यक्रम ठरलेला असला, तरी हे सभापती एकदम

रस्ता बदलायचे.

अशा सभापतींचं कोण ऐकणार नाही? म्हणूनच नरंदे गावाच्या शेतक-यांनी हायब्रिड ज्वारीच्या बियाण्याचे प्लॉट्स आपआपल्या शिवारात घेतले होते. बाहेर बाजारात हायब्रिड ज्वारी ५० पैसे किलो असेल, तर हायब्रिड बियाण्याला साडेसात रुपये भाव येई. सगळ्यांच्याच शिवारात एकाच प्रकारचे बियाणे असल्याने कीडनियंत्रण, मशागत, पाणीपुरवठा ह्या सगळ्या गोष्टी शेतक-यांना एकत्र करता आल्या आणि स्वस्तात पडल्या. गावाला या सगळ्याचा भरपूर फायदा झाला. कोल्हापूरचे शेतकरी कष्टाळू आणि हुशार! कुठलाही नवा प्रयोग करण्यात सर्वात पुढे. याचा मला प्रत्यय आला.

एक वर्ष गेलं आणि माझी बढती होऊन मी सोलापूरला जिल्हा पुरवठा अधिकारी म्हणून रुजू झालो. ज्वारीची लेव्ही गोळा करण्याचा कार्यक्रम सुरू झाला होता. शेतकरी सरकारच्या गोडाऊनमध्ये लेव्हीची ज्वारी आणून घालत होते. पण ज्वारीचा दर कमी आहे, असा ओरडा सुरू झाल्याने शासनाने अचानक असे फर्मान काढले की, लेव्हीची ज्वारी रु. १=२० दराने गोडाउनवर खरेदी करावी. त्यात अडचण ही होती की, बाजारात ८० पैसे ते ९० पैसे दराने ज्वारी विकत मिळत होती. व्यापा-यांना या फर्मानाची बातमी फर्मान येण्यापूर्वीच लागली. त्यांनी ८० पैसे दराने शेतक-यांकडून ज्वारी विकत घेतली आणि फर्मान निघताच तीच ज्वारी रु. १=२० दराने गोडाउनमध्ये विकायचा सपाटा लावला. अर्थात त्यासाठी त्यांना ज्वारी शेतक-यांच्या नावे विकण्याची वेळ आली. ही नावेही त्यांनी टाकली. ब-याच तालुक्यांतून हे इतक्या भरभर होऊ लागले की, दररोज शेकडो पोती गोदामात जमा होऊ लागली.

सोलापूरच्या जिल्ह्यातील व्यापा-यांनाही हा मोह होऊ लागला. पण बार्शीचा मामलेदार एन. टी. चव्हाण याला हा दरांतला फरक कळल्यावर त्याने मला ताबडतोब फोन करून सगळं समजावून सांगितलं. मी त्याचं सर्व बोलणं तारीखवेळेनुसार माझ्या डायरीत नोंदवून घेतलं. नंतर लगेचच फोनवरून शासनातील पुरवठा खात्याच्या डेप्युटी सेक्रेटरींना हे प्रकरण कळवलं आणि पाठोपाठ अहवालही पाठवला. त्यांनी सल्ला दिला की, ते मंत्री महोदयांकडे नोट पाठवून भाव कमी करण्याची शिफारस करतील.

मी लगेच सर्व गोडाउन अधिका-यांना ज्वारी-खरेदी थांबवण्याचे आदेश दिले. ही सर्व गोदामे सहकारी सोसायट्यांच्या वतीने व शासनाच्या आदेशाने चालवली जायची. त्यामुळे सोसायटीच्या अध्यक्षांनी थोडी खळखळ केली. पण मी तहसिलदारांना आदेश दिला की, त्यांनी सोसायट्यांच्या आग्रहाला बळी पडू नये. नंतर मी शासनाच्या आदेशाची वाट पाहत थांबलो. तरीही काही गोडाउन्सनी रु. १=२० या दराने ज्वारी खरेदी चालूच ठेवली. पण त्यांचे प्रमाण अगदीच थोडे होते.

हे दरांतलं अंतर आणि शासनाकडून मोठ्या प्रमाणावर झालेली खरेदी याचा खूप बोभाटा झाला आणि शासनाने सगळ्या प्रकाराची चौकशी एका अंडर सेक्रेटरीकरवी चालविली.

एका तालुक्यात तर अस दिसून आलं की, हा सगळा व्यवहार व्यापारी, गोडाउनकीपर आणि तहसिलदार यांनी संगनमताने केला होता. अंडर सेक्रेटरींनी त्या तहसिलदाराला तिथल्या तिथे सस्पेंड केलं आणि सरकारकडून 'पोस्ट फॅक्टो कन्फर्मेशन' मागवलं. वर्तमानपत्रात ही बातमी आल्यावर सगळे जिल्हाधिकारी आणि पुरवठा अधिकारी घाबरले. मी मात्र स्वस्थ होतो. कारण मीच ही गोष्ट शासनाच्या निदर्शनाला आणली होती व त्याचा तारीखवार खुलासा आणि पुरावा माझ्यापाशी होता.

फिरतफिरत हे अंडर सेक्रेटरी सोलापूरला आले. माझ्या ऑफिसात आल्यावर कोणत्या तालुक्यात किती ज्वारी जमा झाली याचा आढावा त्यांनी घेतला आणि विचारलं,

"तुमच्या जिल्ह्यात इतकी कमी ज्वारी कशी गोळा झाली?"

"मी तुम्हाला यातला सगळा पत्रव्यवहार दाखवतो," असं म्हणून मी अगदी डायरीतल्या नोंदीपासून तो खरेदीच्या प्रकाराला प्रतिबंध करण्याच्या आदेशापर्यंत सगळे कागदपत्र दाखवले. "अहो, हे तर तुम्ही शासनाच्या फायद्याचंच केलं की! एरवी मला तर यातल्या बहुतेक तहसिलमध्ये भ्रष्टाचाराचंच प्रकरण दिसलं. छान केलं तुम्ही. मी

आता बघतो तुमच्या जिल्ह्याच्या बाबतीत काय अहवाल द्यायचा तो, आपण आता कलेक्टरांकडे जाऊ आणि मग मी जाईन रात्रीच्या गाडीनं मुंबईला. घ्या तुम्ही कलेक्टरांची अॅपॉइंटमेंट."

मी उठलो. लगेच कलेक्टरसाहेबांची गाठ घेतली अन् सगळं सांगितलं. कलेक्टरांना प्रथम हे थोडं गूढच वाटलं. अंडर सेक्रेटरींचं याबद्दल काय मत आहे, ते त्यांनी मला खोदूनखोदून विचारलं. पण भिण्याचं काही कारण नाही असं सांगितल्यावर ते निश्चिंत झाले आणि मीही निश्चिंत झालो. मागून अंडर सेक्रेटरी आणि मी पुन्हा कलेक्टरांना भेटलो. दोघांनी माझं खूप कौतुक केलं.

हे अंडर सेक्रेटरी इतके चांगले की, दुस-या दिवशी त्यांनी जो अहवाल सेक्रेटरींपुढे ठेवला, तो मला रात्री ११ वाजता फोनवर वाचून दाखवला. आमच्या जिल्ह्यात झालेल्या कृतीबाबत त्यांनी आमचं कौतुकच केलं होत.

(२)

शेतकरी, व्यापारी आणि शासन यांचं नातं किती बहुपेढी, नाजूक आणि कधीकधी किती धोक्याचं असतं, याचा हा अनुभव मी कधीच विसरणार नाही. शासन जरी शेतक-यांच्या काही हितासाठी करू म्हणत असल, तरी व्यापारी त्यात कसा कोलदांडा घालतात, याचा हा जबरदस्त नमुना होता. अजूनही अडतेमंडळी हाच उद्योग करतात, अशी शेतक-यांची ओरड आहे. त्यामुळेच शेतक-यांनी त्यांचा माल अडतीत न घालता नागरिकांना परस्पर विकावा असे आदेश हल्लीचे सरकार काढत आहे. पण हा माल नागरिकांपर्यंत पोचवायला लागणारा वेळ, त्याची विक्री करण्यासाठी करावयाची तजवीज शेतक-यांजवळ कुठे आहे? तो पिकवील का विकत बसेल?

९९ % शेतकरी स्वतःचं उत्पादन जागेवरच कसं विकलं जाईल, याची व्यवस्था करण्याच्या मागे असतात. खुद्द व्यापारीच चांगलं उत्पादन करणा-या शेतक-यांकडे जाऊन करारमदार करून तो माल विकत घेतात. क्वचित एखादा शेतकरी उत्पादनाच्या व्हॅल्यु ॲडीशनचं आणि प्रोसेसिंगचं तंत्र सांभाळून आपला माल विकतो. यात काही सुधारणा झाली तरच शेतक-याचं काही भलं होईल; नाहीतर शेतकरी असाच रडत, कुथत आपला व्यवसाय चालू ठेवील. बाजार समित्या, त्यांचं राजकारण, अडते, छोटे मध्यस्थ व्यापारी, लिलावाची पद्धत ह्या सगळ्यांना जर शिस्तीत बसवून माल ग्राहकापर्यंत पोचेल अशी व्यवस्था केली, तरच शेतकरी आणि ग्राहक सुखी होतील.

असो. मूळ विषयाकडे वळू. आमच्या सोलापूर जिल्ह्यावरील ज्वारी खरेदीच्या बाबतीत आलेले संकट टळले. पण यापुढे आणखी समस्या उभ्या राहणार होत्या. काही गोडाउनकीपर आणि तहसिलदार यांना सस्पेंड करून मूळ घोटाळ्याची समाप्ती होणार नव्हती. गोडाउनमध्ये ज्यांनी ज्वारी जमा केली होती, अशा (ख-या, खोट्या) शेतक-यांची यादी खूप मोठी होती. बरे, या ज्वारीला नाशवंत होण्याचा शाप होता. हायब्रिड ज्वारीचं भुसकट व्हायलाही वेळ लागत नसे. इतकी ज्वारी गोडाउनमध्ये असल्यामुळे उंदीर, घुशींची चंगळ होऊ लागली. शासनाकडे नवे अहवाल निरनिराळ्या जिल्ह्यांतून जाऊ लागले. सोलापूर वगळता इतर जिल्ह्यांत खूप साठे जमा झाले होते.

गंमत पहा – या काळातच सोलापूरला दुष्काळ पडला. स्वस्त धान्य दुकानांना ज्वारी आणि गहू पुरवण्याची अडचण निर्माण झाली. सरकारमध्ये त्या वेळेला अशी एक यंत्रणा होती की, एका जिल्ह्यात जर कमी साठा असला, तर ज्या जिल्ह्याकडे जास्त प्रमाणात साठा आहे. त्या जिल्ह्यातून कमी साठा असलेल्या जिल्ह्याकडे परस्पर धान्य पाठवले जाई. माझ्या जिल्ह्यात (सोलापूर) साठा कमी होता आणि इतरत्र भरपूर साठा होता. त्यामुळे माझ्या जिल्ह्याकडे हा हायब्रिडसाठा भराभर ट्रकने येऊ लागला; इतका की, सोलापूर जिल्हा ज्वारीच्या बाबतीत सरप्लस झाला. त्यात ज्वारीची प्रत घसरत चाललेली होती.

एकूणच या ज्वारीचं करायचं काय? याचा अगदी वरच्या पातळीवर विचार होऊन ही ज्वारी आठवडा-बाजारात रेशनकार्ड नसलेल्यांनाही विकली जावी, असा आदेश शासनाने काढला. मग स्वस्त धान्य दुकानांनी बाजाराचा अंदाज घेऊन कधी ८० पैसे किलो तर कधी ५० पैसे किलो अशा दराने ही ज्वारी विकली. दोन

अडीच महिन्यांनंतर मोठ्या परिश्रमाने ह्या ज्वारीची एकदाची विल्हेवाट लागली. सरकारवरील टीका आता थांबली.

पहा, म्हणजे शेतक-याने पिकवलेल्या ज्वारीला बाजारात भाव नव्हताच. त्याला सरकार मदत करायला गेलं तर, सरकारच्याही ते अंगाशी आलं. मधल्यामध्ये व्यापारी, कर्मचारी, तहसिलदार यांनी हात धुऊन घेतले आणि शेवटी निकृष्ट ज्वारी आठवडी बाजारात विकावी लागली. शेतकरी, व्यापारी आणि शासकीय अधिकारी या सगळ्यांचं हे त्रांगडं मला भावलं नाही. CCC



अनुक्रमणिका

# समाजधर्म आणि संस्कृती

अरविंद हसमनीस

मनुष्य हा विचारक्षम प्राणी आहे आणि त्या क्षमतेमुळेच त्याला समविचारांचे, विचारवंतांचे नि वैचारिक उत्थानांच्या विविध मार्गांचे प्रचंड आकर्षण आहे. या आकर्षणाचाच परिणाम म्हणून समविचारी व्यक्ती व त्यांच्या अनुभूती यांविषयीही त्याला कुतुहल आहे. त्यामुळेच त्यांच्या आदानप्रदानाला तो अनुकूल आहे. याचाच अर्थ असा की, समुच्चयाने सामाजिक समान गुणांच्या व तत्त्वांच्या अस्तित्वाचे ते प्रमाण आहे आणि ते गुण व्यक्तित्वास प्रदान करणा-या त्या परतत्त्वाच्या स्थायी अस्तित्वाची ग्वाहीही देणारे ते प्रमाण आहे. हा भारतीय तत्त्वज्ञानाचा गाभा आहे. विचार-धारा आहे. त्याची जाणीव असणे आणि ते तत्त्व सर्वाठायी स्थित आहे हे मान्य करणे हाच आमचा–भारतीयांचा–सर्व-धर्म-समभाव आहे, हे मान्य करावे लागेल. प्रेम, दया, क्षमा, शांती, सहजसाहाय्यता (सहकार्य) आणि सोशीकता म्हणजेच सहिष्णुता हे तर इथल्या समष्टीचे उपजत भाव नि सहजधर्म आहेत. इथे 'धर्म' याचा अर्थही 'भाव' असाच आहे. या सर्वांचा अंगलिनिर्देश, या गुणांचे अस्तित्व साधारणतः सर्वाठायी वास करीत असते म्हणून ती सह-समृद्धी-जीविताची तत्त्वे आहेत, याकडेच आहे. ती सर्वांना व्यापून आहेत, अशीही सर्व भारतीयांची मनोधारणा आहे. शिवाय ती तारक, प्रेरक नि उद्धारकही आहेत. हाच सहजभाव भारतीयांनी धारला म्हणून तो 'धर्म' म्हणूनही स्वीकारला गेला आहे. यात हेही अनुस्यूत आहे की, प्रत्येक गुणाचा धर्म वेगळा आहे आणि गुणधारणेने तो आम्ही स्वीकारला आहे. त्यामुळे गुणधर्माने आम्ही धार्मिक आहोतच. पण समुच्चयाने गुणांच्याही समतोलाचे रक्षक नि संवर्धकही आम्ही आहोत. या अर्थाने सर्वच भारतीय सर्वधर्मसमभावीच आहोत आणि हेच या भूमीवरील वास्तव आहे. यास विरोध करणारा कोणत्या तत्त्वज्ञाचा पाईक ठरेल? त्याच्या निष्ठा कोणत्या असतील? याचा प्रत्येकाने किमान धांडोळा घ्यावयास हवा.

भारतीय समाज-व्यक्तित्वाचे नि एकेक व्यक्तीचेही वैशिष्ट्य हे की, त्यांस केवळ समविचारांचेच आकर्षण आहे असे नव्हे, तर विविध विचारांचे नि विविध-क्षेत्रीय–ज्ञानविचारांचेही त्यांना प्रचंड आकर्षण आहे. केवळ आकर्षणच नव्हे, तर त्यावर विचारमंथन करण्याकडेही त्यांचा कल आहे. असे विचारमंथन खाजगतातही केले जाते, तसेच ते सार्वजनिक स्वरूपातही केले जाते.

आजही ती परंपरा चालू आहे. त्यामुळे सामान्य श्रोत्यांनाही त्या मंथनाने किमान श्रवणसंस्काराचा लाभ होई. त्याने वैचारिक वैविध्याची, त्यातील मत-मतांतराची, त्यांच्या स्तरांची, भाषिकपेडांची, अर्थ-गुह्यांगांची, त्यातील संयुक्त-श्रेयसांची नि अप-श्रेयसांतील लिप्त घावांची जाण पैदास होई. शिवाय अशा मंथनांमुळेच विचारसरणींची निर्मिती होत गेली. या सर्वांचा परिणाम असा झाला की, विचारवंत असो की श्रोतृगण असो, त्यातील सहभागी व्यक्ती एकांती चिंतनशील बनली. त्यामुळे उच्च-गुण-तत्त्वांच्या चैतन्याने भारतीय समाज सार्वजनिकरीत्याही चिंतनशील बनलेला आहे. त्यामुळेच 'वादे वादे जायते तत्त्वबोधः' याची अनुभूती त्याला आली आहे. येते आहे. अर्थातच सर्वच चिंतक विचारवंत होते वा असतात असे नाही; परंतु व्यावहारिकांतूनही सात्त्विकतेला सांभाळण्याचा, पर्यायाने वृद्धिंगत करण्याचा निधिध्यास त्यामुळे साधला जाई. या चिंतनशीलतेमुळेच येथील मानवी व्यवहाराला दोन धारा निर्माण झाल्या. एकीकडे आत्मचिंतनाने आत्मपरीक्षण नि त्यातून आत्मशोध आणि त्याचा परिणाम म्हणून आत्मबोध प्राप्त झाला. ही आध्यात्मिकाची धार. तर दुसरीकडे, चिंतनाने व्यवहारात आत्मभान, सचोटी नि व्यावहारिक विचारस्पष्टता हे गुणविशेष व्यक्तित्वात प्रविष्ठ झाले. त्यामुळे व्यक्तित्व विकास आणि सफल कर्तव्यपूर्तीचे समाधान व्यक्तीस मिळू लागले. आर्थिक दुर्बलतेतील ही श्रीमंती त्यांच्या जीवनानुभवाला सबलता

अनुक्रमणिका








नि संपन्नता देते, याचाही अनुभव व्यक्तीस त्यातून येत होता.

हे सर्वच विवेचन एतद्देशियांच्या विचारांचे, त्यांच्या वैचारिक मंथनांचे, शिवाय ती सर्व मंथने ही त्यांच्या चिंतनांची आणि आत्मबोधांची शाश्वत परिणती होती, म्हणून तर ती शाश्वत गुण-तत्त्वांच्या शोधांची प्रमाणक होती. तीच शाश्वत सत्ये आहेत असे मानून ती समाजाने स्वीकारली. धारली गेली. प्रस्थापित केली (Apply केली गेली). हजारो वर्षांच्या त्या व्यवस्थापनाला, धोरणांना नि त्या अपेक्षित यशस्वी जीवनपद्धतीस आता 'धर्म' म्हटले, तर ती चूक कोणाची? नूतन विचारवंतांची? की ज्यांच्या वैचारिक अनुभूतीतून प्रतीत झालेल्या नि उपयुक्ततेची श्रेष्ठता गाठलेल्या त्या व्यवस्थापनाची? की ज्यांच्या सांघिक संमतीने स्वीकृत केलेल्या सहभाव, सद्भाव नि समभावांच्या उन्नतीतील एकूणच समाधान प्राप्तकर्त्या समाजाची?

अर्थात हे समत्व, प्रेम, दया, सहसाह्यता, सोशीकता म्हणजेच सहिष्णुता या मूलस्थ गुणांच्या आधारे प्रमाणित झालेले आहे, असे त्या काळाचा विचार करता मानावे लागेल. यातील भेद केवळ मोह, स्वार्थ आणि सत्ता यांच्या कळीमुळे पडतो, जो त्या परमेश्वराचा वा सत्याचा कोणताच हिस्सा नसतो. त्या मूलस्थ गुणांमुळेच समाजाची ही उजळ प्रतिमा आजही सुप्रतिष्ठित आहे आणि आजही अभेद्य आहे, हेच विचारांती मान्य करावे लागेल. अशा कोट्यवधी तेजस्वी अनुभवांचे रिवाज हजारो वर्षे संततधारेसारखे अवधारित आले आहेत. त्यांस परंपरा म्हणावयाचे नाही, तर कोणत्या संयुक्त संज्ञेने त्यास अनुभवावयाचे? आणि आजही त्या रिवाजांची प्रचिती तितकीच तजेलदार आहे. 'तमसो माम् जोतिर्गमय', 'उदर भरण नोहे जाणिजे यज्ञकर्म', 'मोहाने स्मृती लोपली', 'समत्वेविषयी वर्ते, त्यास लाभे प्रसन्नता' अशी हजारो उदाहरणे देता येतील. हे असे होण्याचे कारण विचार-चिंतनाने ती विचारधारा आत्मशोधापासून आत्मबोधापर्यंत मानवाला नेते आणि अशा चिरंजीवी तत्त्वांचा बोध त्या व्यवस्थेला तेजस्वी करून जाते. ही आत्मिक-शक्तीचीधारा (आध्यात्मिकतेची) पाश्चात्त्य विचारसरणीतून ठळकपणे दिसून येत नाही. याचे ताजे उदाहरण म्हणजे 'मार्क्सवाद', जो एका शतकाच्या आतच आपली उपयुक्तता हरवून बसला. आधुनिक पाश्चात्त्य विचारवंतांना 'अध्यात्मच' अज्ञात आहे. हे एकमेव क्षेत्र सोडून अन्य क्षेत्रांत त्यांचे संशोधन चालू आहे. त्यातही तत्त्वज्ञान आणि अंतःप्रेरणा (म्हणजे आत्मिक-प्रेरणा-ज्ञान) यांचा अभावच त्यांच्या या सा-या संशोधनातून दिसून येतो आहे. स्टिफन हॉकिंग या पाश्चात्त्य दिव्य शास्त्रज्ञाने, आपल्या "दि ग्रँड डिझाइन" (The Grand Design) या पुस्तकात आपले निरीक्षण नोंदविले आहे की, "आधुनिक विज्ञान इतके संकुचित पायावर येऊन उभे आहे की,

- तत्त्वज्ञान (Philosophy) हे भौतिक शास्त्रीय ज्ञानाचे (परिक्षेत्रीय) अवकाश म्हणून जवळजवळ शून्यवत (मृत) झालेले आहे.
- आधुनिक विज्ञानातील अंतःप्रेरणेची शक्ती (नि तिचे अस्तित्वही) अतः संपुष्टातच आलेले आहे.
- सध्या भौतिकशास्त्रांचे अधिष्ठान नि भविष्य पूर्णपणे गणिती पद्धतीवरच अवलंबून आहे. क्वाँटम् थिअरी नि मेकॅनिझम (Quantum Theory / Mechanism) किंवा रज्जू-सिद्धान्त (String Theory) यांना समजून घ्यायचे असेल, तर ते फक्त गणिताद्वारेच घ्यावे लागते. अन्य मार्गांनी वा पद्धतींनी ते सिद्ध करता येत नाहीत. शिवाय आपले दैनंदिन आयुष्यातील अनुभव, हे विषय शिकवितांनाही काहीही उपयोगी पडत नाहीत."

मानवीय प्रतिभाशक्ती-मतीचा संकोच भौतिक-संशोधनातून कसा होतो आहे, हेच यातून स्पष्ट होते आहे. याचे मुख्य कारण अंतःप्रेरणांवरील श्रद्धेयांना नाकारण्याची वाढलेली प्रवृत्ती आणि अंतःप्रेरणांतील प्रात्यक्षिक प्रयोगक्षमतेचा असलेला अभाव. त्यामुळे त्यांवरील श्रद्धा म्हणजे अंधश्रद्धाच असे ठरविले जाऊ लागले आहे. प्रयोगशाळेत वा गणिती सूत्रांतून जे सिद्ध करता येत नाही ते सर्वच मिथकीय; म्हणून अंधश्रद्धीयच असे मानले जाऊ लागले आहे. याचा प्रादुर्भाव सर्वच क्षेत्रांत झालेला दिसून येतो आहे. उदा., डॉक्टर आता रोगनिदान करीत नाहीत. ते चाचण्यांच्या आधारे रोगाची शक्यता वर्तवितात. निदानाला (डायग्नोसिसला) अंतःप्रेरणेची गरज लागते. त्या शक्तीचे अधिष्ठान शास्त्रात

संपुष्टात आल्याने यास विरोध. असो.

आम्हाला या आध्यात्मिक शक्तींचा म्हणजेच अंतः-प्रेरणांच्या शक्तींचा वारसा मिळालेला आहे. त्याची अनुभूती कित्येकांना आजही येते आहे. त्याचा आम्हाला अभिमान आहे. कारण मानवी जीवनाला जे सौंदर्य नि तत्त्वज्ञानाचे तेज प्राप्त झालेले आहे, त्याचे केवळ कारण आत्मिक शक्तींचा त्याला झालेला स्पर्श, त्यांचे अधिष्ठान नि सृजनातील त्यांचे कर्तृत्व हेच कारणीभूत आहे. म्हणूनच स्टिफन हॉकिंग यांनी त्यांच्या लेखनात अंतःप्रेरणा नि तत्त्वज्ञान यांच्या अभावाचा आवर्जून केलेला उल्लेख हा अत्यंत चिंतनीय आहे.

विचारवंतांनी हे ध्यानात घ्यावयास हवे की, कोणताही धर्म आजपर्यंत सुदृढ संस्कृतीला जन्म देऊ शकलेला नाही आणि देऊही शकणार नाही. मोहंजोदडो संस्कृतीचा कोणता धर्म होता? ईजिप्शियन वा मायासंस्कृतीचा कोणता धर्म होता? किंवा लॅटिन नि रोमन संस्कृतीचा कोणता धर्म होता? संस्कृती धर्माच्या नावाने घडतच नसते. ती घडत असते गुणांच्या (Qualities) कसांनी नि स्वयं-सिद्ध-स्वातंत्र्याच्या संमिलनाने. तरीही त्या निर्मितीच्या प्रारंभिक कालखंडात; गुणधारणेची सर्व संमती, तिच्या पालनाची शिस्त नि सांघिक आचरणातील सातत्य या पूर्वअटींची पूर्तता (सर्वप्रथम) तिला करावीच लागते. शिवाय या गुणसंवर्धन व स्वातंत्र्य यांच्या अटींबरोबरच, सार्वत्रिक गुणकांडांच्या (कर्मांच्या) शाश्वत स्तरांचे मोल तिला असतेच, लागतेच. त्यांच्याच परिघांवर तर तिची कक्षा नि अवकाश ठरत असते. त्यामुळेच धर्माची बंधने-सुद्धा तिला अडसर बनतात. ती कधीच धर्मभूत, धर्माधीन वा धार्मिक नसते. ख-या अर्थाने ती धर्मापार असते. धर्म, अध्यात्म वा संस्कृती ही कधी एक नाहीत. यांतील एकही एकासारखे नाही. ती सर्वस्वी स्वतंत्र आहेत. वर म्हटल्याप्रमाणे हा समाजच जेव्हा चिंतनशील बनला नि त्या चिंतनांची आणि आत्मबोधनांची परिणती शाश्वत सूत्रात झाली आणि म्हणून ती सूत्रे शाश्वत गुण-तत्त्वांच्या शोधांची प्रमाणके ठरली. तीच शाश्वत सत्ये मानून या समाजाने स्वीकारली. धारली. कार्यवाहीत आणली. समाजाने जे अंगीकारले, तो गुणावधिष्ठित नि गुणवर्धिष्णुतेचा मार्ग होता. त्यास धर्म नांवाचे अंग नव्हते. फक्त तो मार्ग धारला म्हणून त्यास 'धर्म' म्हणा हवे तर. मूलतः आम्हाला धर्मच नाही. ही जीवनपद्धती हाच आमचा ध्यास होता. तो निरंतर आहे नि परिवर्तनीय आहे. तसे पाहता आम्ही निधर्मीच. नव्हे, धर्मातीत आहोत. या वास्तवाचे भान काहींनाच उरलेले आहे. काहींना याची जाण आहे परंतु भान नाही. त्यामुळे ते भ्रमिष्ठासारखे कधी बाजूने कधी विरोधी व्यंगिक वक्तव्ये करीत असतात. पण बहुतांशी ज्ञानी हाच सनातन धर्म म्हणून किंचाळत असतात.

गुणांचा कस, त्यांच्या धारणेचे पूर्ण स्वातंत्र्य यांशिवाय सर्वसंमती, पालनातील शिस्त, नि त्यांचे सांघिक आचरण या पूर्वअटींचा विचार केला. केवळ गुण-कर्मांच्या उच्चतम अंगीकारानेच सांस्कृतिकतेची पातळी उंचावते, याचाही विचार केला. पण तिच्या प्रगतीला तेवढ्यानेच प्रौढत्व प्राप्त होत नसते; तर तिच्या वर्तमान परंपरेतील नव्या शोधांच्या–नव्या कसांच्या–आधारावरच तिची प्रगल्भता नि प्रज्वलता अवलंबून असते. कालपरत्वे लय पावणा-या विचार-आचारांनी ती गतिमंद होतेच नि निस्तेजाला कलते. म्हणूनच संस्कृतीला वैचारिक-आचरिक-आचरणाची दीर्घ बैठक असावी लागते. ती सातत्यपूर्ण प्रवाहीही असावी लागते. त्यामुळे व्यष्टी नि समष्टी यांच्या प्रगल्भतेत होण-या वाढीने तिची प्रगती गतिमान होते. त्या सर्व प्रवाही संचयालाच संस्कृती संबोधतात. थोडक्यात, गुणांचा व्यक्तिनिवेश विचार, त्याबरहुकूम आचार यांमुळे व्यक्तीवर त्याचे प्रगत परिणाम दिसून येतात. त्या परिणामांचा प्रभाव म्हणून निकट समूह त्याचे आचरण करतो नि त्या समूहाच्या प्रगत-प्रभावाचा परिणाम म्हणून ते समाज धारण करतो. अशा प्रकारे व्यक्तिगत विचार-आचार, समाजधारणेत संस्कृती होतो. उलट, समाजधारणेतील व्यक्तिगत आचार, परंपरा म्हणून दृढ होते. अशा परंपरेतील नवनव्या वैचारिक आवर्तनांनीच सांस्कृतिक प्रगल्भतेची प्रमाणित बीजे संस्कृतीला प्राप्त होतात नि तिला अधिक प्रज्ञावान करून जातात. संस्कृती अशा प्रकारे, समाजप्रबोधनातील प्रगल्भतेचे स्वरूप असते; जे तिला अभिमत-रूप देते. काही विचार तिथे स्थायी असतात. तरीही जे त्यास अस्थायी असतात, त्या रूपाला अनुरूप नसतात, उपयुक्त नसतात, ते ती योग्य समयी



अनुक्रमणिका

उत्सर्जित करते. मानवी पचनक्रियेसारखीच ही प्रक्रिया असते.

उलट, समाजमानसावर जेव्हा वारसांचा पगडा स्थापित होतो, तेव्हा विचारांपेक्षा गतानुगतिक आचारालाच महत्ता प्राप्त होते. त्याने पारंपारिक विचारच तेवढे कालातीत व संपन्न म्हणून ते ग्राह्य, हीच धारणा बळकट होते आणि नवा वा अन्य प्रगल्भ स्वतंत्र विचार त्याज्य मानण्याकडेच अस्थायी कल राहतो. भारतीय माणसाची अशी धारणा होऊन राहिली आहे की, नवविचारांच्या स्वीकाराने प्राचीनत्वाची नाळ तुटते वा तोडली जाते आणि त्यामुळे सांस्कृतिक एकाकीपणा येतो, जो अत्यंत क्लेशदायी असतो.

पण श्रेष्ठ परंपरा अशाच स्वतंत्र, स्वयंभू विचार-धारांना स्वतःत सामावून घेऊन अधिक प्रकाशमान होत असतात. अशा स्वतंत्र, स्वयंभू विचारांच्या संक्रमण वा संम्मिलन कालातील मंथन हा अस्तित्वाच्या संघर्षाचा अटळ भाग असतो. पण त्यानेच परंपरागताला जाज्वल्याचे तेज येत असते.

केवळ वाढ म्हणजे प्रगती नव्हे. जे न पेरताही उगवते ती प्रगती नव्हे. जे जाणीवपूर्वक, मशागत करून पेरले जाते, जाणिवेने जपले जाते, जेव्हा त्याचे विध्वंसक प्रवृत्तीपासून रक्षण केले जाते आणि त्याही परिस्थितीत रक्षिले जाते, ती सर्व सधन-साधन-संहिता म्हणजेच सांस्कृतिकता आणि त्यातील वाढ ही अधिक सांस्कृतिक प्रगती होय. म्हणून ती चर्चेस, मंथनास अधिक ग्राह्य. याचेही भान विचारवंतास, रसिकास नि अभ्यासकास असावयास हवे.

गेल्या दोन शतकांत मानवाने बरीच प्रगती केलेली दिसून येते आहे. परंतु त्यातून कोणत्याही सुदृढ संस्कृतीचा उदय झालेला वा होताना दिसत नाही. वैज्ञानिक प्रगती, विशेषतः तांत्रिक प्रगती, त्यातही क्षेपणास्त्रासारखी अस्त्रे म्हणजे संस्कृती नव्हेच नव्हे. त्या आधारे आर्थिक सुबत्ता आली आहे. ती म्हणजे ही संस्कृती नव्हे. आज जी प्रगती घडते आहे तिचा आधार; युरोपियनांनी अन्य क्षेत्रीय भागांचे केलेले जबरी कब्जीकरण नि तेथील संसाधनांचे–अगदी मानवी श्रम नि बौद्धिक साधनांचे–जबरी शोषण (जे आजही IT क्षेत्रात चालू आहे) यांतून ते निर्मिले गेले आहे. शिवाय निसर्गाची हानी नि नैसर्गिक तत्त्वांचे वस्त्रहरण, हे मनमानी, जंगली वृत्तीने नि जगाला अंधारात ठेवून केलेले निरंकुश वर्तन – या पायावरच ती प्रगती उभी आहे. म्हणून मी तिला बंगाल प्रांतातील काळी जादू नि भानामतीचे प्रयोग असे संबोधतो. या संदर्भात लिहिला जाईल तो शोषण-संग्रामांचा इतिहास असेल. तो संस्कृती-कोष कधीच असणार नाही.

ख्रिस्तपूर्व बौद्धकालातही, त्यांच्या निरिच्छ नि शून्यवादाने समाजमानसाला जन्मजात भागधेयापासून नैसर्गिक भोगापर्यंत सर्वच आस्वादांना वंचित रहावे लागले. बुद्ध म्हणतो, "वासनेसारखा अग्नी नाही. द्वेषासारखा कली नाही. ऐहिक सुखासारखे दुःख नाही. तृष्णेसारखी नदी नाही आणि मोहासारखा दुस्तर पाश नाही." त्यामुळे व्यक्तिपरत्वे अनिच्छांचे काहूरच तो समाज उपभोगीत होता. सर्व ऐहिक संपन्नतेला झिडकारण्याच्या विचारसरणीने ऐहिक आनंदापासून बौद्धिक आनंदापर्यंत नि व्यक्ति-स्वातंत्र्यापासून व्यासंगस्वातंत्र्यापर्यंतच्या सर्व स्वातंत्र्यांना डावलण्यात धर्मप्रतिष्ठा मानली गेली. त्याने समाज-मानस सुदृढ होण्याऐवजी विकलांगतेचाच अनुभव तो घेत राहिला. त्यामुळे त्या काळात सार्वत्रिक नि सांस्कृतिक सुसंस्कृतताही प्रज्वलित होतांना दिसत नाही. उलट, अशोकाच्या कलिंगावरील चढाईमुळे 'एक लाख बांगडी फुटल्याचा' दाखला प्रथमच इतिहासाने नोंदला आहे. सत्ता, मोह, स्वार्थ यांच्यामुळे संस्कृती निर्माण होत नाही. तसेच भव्य पुतळे, भव्य इमारती/वास्तू किंवा लेणी यांतूनही संस्कृती निर्माण होत नाही. त्याही पुढे जाऊन असेही म्हणता येईल की, केवळ संपन्नतेतून नि दहशतीशांततेतून आलेल्या, त्याही पुढील कालखंडातील भोगवादाने किंवा ऐषवादी सत्ताधीशांच्या अहंभावाने साधी सांस्कृतिकताही निर्माण झाली नाही. तसेच सर्वकालिक बुद्धिवादी नि प्रौढीवादी पुरोगामी यांच्याही सुधारणावादाने संस्कृती निर्माण होत नाही. याचा अनुभव तर गेली दोनशे वर्षे आपण घेत आहोत. तरीही संस्कृतीतच संस्कृतीसंवर्धनाची जैवनिक-कार्यप्रणाली कार्यरत असतेच. शरीरावरील जखमा नैसर्गिक रीत्या भरतात तशा वा वृक्षाच्या गळलेल्या पाना-फांद्यांच्या दिठीला नवीन सृजन व्हावे तसे; तिच्यातील स्फुरण, भूस्खलन नि जनन चालूच

असते. त्याला गतिशीलता नि शीलता प्राप्त होण्यासाठी जागृत सज्जन जनांनी प्रयास करावयास हवेत. मानवाची कर्मांगे ही जशी केवळ कर्मांगे नसतात, ती शरीरांतर्गत अष्ट-शक्तींची (पंचमहाभूते अधिक मनःशक्ती, प्राणशक्ती नि प्रतिभ-मती-शक्ती यांची) प्रातिनिधिक प्रतिकेही असतात. त्यामुळे मानवीय (भारतीय) संस्कृतीलाही संकेत, संदर्भ नि प्रतीक-रूपके यांचे प्रतिभा-सौंदर्यही अंगभूत झालेले आहे.

पाश्चिमात्य लोकांचाही एक संकेत आहे.

संकेत हे संस्कृतीची प्रतीके असतात. ते चालीरीतीतून, भाषेच्या ठेवणीतून, मानवी वर्तनातून, हावभावांतून अशा जीवनाच्या अनेक अंगोपांगांतून प्रत्यही प्रतीत होत असतात. त्यांच्या अर्थगर्भात त्यात्या समाजाच्या स्थायी स्वभाव-प्रभावांची ओळख होत असते. जान-पहचान होत असते. तरीही त्यांचा संस्कृती-संकेत म्हणून आपण साकल्याने विचारच करीत नसतो. उलट, 'गंमत' या आविर्भावाने त्यांना दुर्लक्षित करीत असतो. खरी संस्कृतीची जाण/ओळख अशा छोट्याछोट्या संकेतांतून घडत असते. त्याची अनेक उदाहरणे आजही उपस्थित आहेत. आपण चिऊ-काऊची गोष्ट सांगतो (चिऊताई चिऊताई दार उघड....) वा ससा-कासवाची गोष्ट सांगतो. अशा गोष्टी जरी उत्स्फूर्त असल्या, तरी त्यांतून भारतीय मनाची सांस्कृतिकता उलगडत असते. पहा : चिमणीच्या दार उघडण्याच्या विलंबाला तिची बाळाविषयीची प्राथमिकता, कर्तव्याचे महत्त्व, तत्परता, (त्यातील) समर्पितता, पाल्याविषयीची आस्था इ. नी सृजनाच्या संरक्षणाविषयीची दक्षता, त्याचे ताण, काळजी इ. या गुणांची बेरीज तिथे अवगुंठित झालेली असते. शिवाय बाह्य अनिष्ठांच्या अस्तित्वाची जाणीव व त्याबाबतची जागरूकताही तिथे खडी असते. हे सर्व नव्या पिढीबाबतची आस्था, आपुलकी, प्रेम यांबरोबरच त्यांच्या भवितव्या-विषयीचा गंभीर विचार नि त्याच्या सुसंस्कृततेच्या भाव-स्वप्नांचा भार तिथे असतोच. शिवाय संस्कृतीच्या दृष्टीने, 'माणूस' घडविण्याचे साधन म्हणून त्या मानवी गोळ्याला सांभाळावयास, पोसावयास नि घडवावयास हवे, याचा तो सांकेतिक संवाद असतो. उलट, ससा-कासवाच्या गोष्टीत, जाणिवांच्या पात्याला धार लावण्यासाठी नि आभेच्या गाभा-यातील ज्ञानाला आत्मसात करण्यासाठी त्या प्रतीकांचे प्रयोजन असते. तसेच चांदोबाच्या गीतातून तो भागला असला तरी 'मामाचा वाडा चिरेबंदी' असण्याची नात्यातील–मूलतः माणुसकीतील–चिरेबंद आधाराची ती वीण असते. वीट असते. तीच त्या अजाण-जाणत्या बालकाच्या मानसिक पोषणासाठीही 'कवच' होत असते. अगदी 'ज्याने चोच दिली तोच चारा पेरीत असतो', याचाही सांस्कृतिक संकेत तोच असतो. असो.

हे असे आपले सांस्कृतिक संकेत आपल्या संस्कृतीच्या आशयगर्भ, प्रगल्भ प्रतिमाही असतात नि समाजमानसाच्या अत्युच्च जाणिवांच्या उत्तुंग ध्वजाही असतात, तरीही संकेत हे सांस्कृतिक प्रज्ञेचे प्रयोजक[१] असतात, हेच आम्ही विसरून गेलो आहोत.

पाश्चिमात्यांच्या संकेतांच्या रिवाजांचे गूढार्थ संशोधण्यासारखेच आहेत. त्याचा एक नमुना–त्यांच्याच स्वभावधर्माचा परिपाकच जणू!

इंग्रजी शब्दकोशात secular या शब्दाआधी sector हा शब्द येतो आणि त्यानंतर secular हा शब्द येतो. या मांडणीतील 'मांडवणी' वा चलाख-चपखलता जर लक्षात आली तरच त्यांच्या 'सुशिक्षित' मानसिकतेची झलक आपण जाणू शकतो. ती जाणवतेच.

गोलाच्या (पृथ्वीच्या?) एका विभागावर अधिकाराची निश्चिती करावयाची असेल, तर प्रथम 'secular' (minded) व्हा. पुन्हा सेक्युलरचा अर्थ 'जड वस्तूंशी संबंधित' असा आहे. शिवाय ऐहिक गोष्टींना धर्मच नसतो. म्हणजे त्या secular च! sector म्हणजे क्षेत्रीय-विभागाच्या संपादनाला एकदा secular केले की, धर्मप्रसाराला अवकाशच अवकाश प्राप्त होते. ते ज्यांचे sector आहे त्यांनी ते secure केले की, काम-तमाम करावे. करावेच, हा दंडक. secular चा हाच संकेत आहे आणि तो त्यांच्या 'सभ्यतेचा' अर्थ आहे. पण हे लक्षात कोण घेतो? अभ्यास म्हणजे केवळ ज्ञानाचा पाठपुरावा नव्हे, त्यातील सांस्कृतिक सभ्यतांच्या

१. प्रयोजक = कार्यप्रवर्तक, करविता, प्रेरक.

अध्ययनाचा नि आकलनांचा ध्यासही असावयास हवा. सजातीय मानवी व्यवहारांनाही 'जडवादी मानून, तसेच त्यांच्याशी व्यवहार करा, हीच मानसिकता त्यातून प्रकट होताना दिसते. या आकलनास या समाजातील किमान सभ्य, अनुभवी, सुशिक्षित लोकांचा विरोध नसावा, असे मला वाटते.

समाज-व्यक्तिमत्त्वातील जागृत व्यक्तींचे उच्चार, विचार नि आचार यांच्या सामंजस्यपूर्ण वर्तनाने समाजात समता, सद्‌भाव, सहिष्णुता, समज नि समाधान यांचे अबाधित स्वातंत्र्य, शिवाय दोषनिवारक गुणांचे नि गुणवर्धिष्णू करणा-या उपचारांचे जतन आणि मोह, स्वार्थ, सत्ता नि संपत्ती यांनाही वश न होणारी समाजप्रवृत्ती; तिच्या सार्वत्रिक नि सर्वकालिक संकल्पनेची सक्त निगराणी, त्यासाठीची दक्षता – या सर्वसमावेशक सजग समाजप्रवृत्तीला नि त्या तिच्या प्रतिष्ठेला संस्कृती मानावे. ती त्यानेच (स्वयंभूपणेच) प्रवाही, परिवर्तनीय नि प्रत्ययी होईलच. तिच्यातील आत्मिक चिंतनाने तिला सौंदर्य आणि तात्त्विक बलाचे तेजही प्राप्त होईल. तरीही तिच्यातील प्रभावांचे चढ-उतारही आपणास आपणास दिसून येतातच. ते सर्व समाजसापेक्ष असतात.

समाज याचा मी असा अर्थ लावतो– "समुच्चयाने जो सम आहे आज, तो समाज." सदाचार नि सद्विचारप्रवृत्तींच्या समानतेच्या गुणसंचयाच्या समाजास सत्य-समाज नि त्या काळास सत्ययुग म्हणत. आज स्वार्थ, सत्ता नि कली म्हणजे उपभोग यांच्याच समुच्चयाने समान असलेला समाज व्यवहारतो आहे. म्हणून तो कली नि काळास कली-युग म्हणावे लागते.

हा संस्कृतीच्या परिवर्तनाला अतियोग्य काल आहे, असेच म्हणावे लागेल. नि त्या दिशेने तिची गती प्रभावी होताना दिसते आहे. समाजप्रवृत्तीतील बदलाची सूचकता दिसली तरी प्रवृत्तीप्रवाहातही ती दिशा नि गती येण्यास अवधी लागेल. त्यास त्या (सत्ययुगीन) रेट्याची क्षमता प्राप्त होण्यासही तशा प्रवृत्तींचा गुणाकार व्हावयास हवा. गाळात रुतलेला मचवाही स्वच्छ निळ्या प्रवाहात ओढून नेणे त्रासदायक, गाळात रुतण्याची भीती नि निःस्वार्थ सहकाराची अपेक्षा; घाम गाळावयास लावतातच. पण हेही परिवर्तन होईलच नि नव्या जाणिवांच्या तजेल्याने ती अधिक प्रभाती-प्रसन्न होऊन प्रवाही होईल. म्हणूनच तिला प्रणाम करून म्हणावे वाटते – "संभवामि युगे युगे!"

C C C

---



अनुक्रमणिका

# धर्मशील मनाची निकड

जीवन आनंदगांवकर

आपला धर्म मग तो कोणताही असो, आपल्या सर्व प्रश्नांची उत्तरे देऊ शकेल हा आपला शुद्ध गैरसमज आहे, असे जे. कृष्णमूर्तींचे ठाम मत आहे आणि ते खरेही आहे. धर्मांनी अनेक विषयांचा परामर्श घेतला असला तरीही, कोणताही धर्म हा सर्वसमावेशक असत नाही. मात्र ज्या धर्मशील मनाविषयी जे. कृष्णमूर्ती सांगतात, ते मन हे सर्वसमावेशक आणि त्याच वेळी अलिप्तही असते. धर्मशील मनाला राष्ट्रीयत्व, धर्म, जात असत नाही. त्या मनाला भूतकाळ नसतो. म्हणजे स्मृती नसतात. त्या मनात श्रद्धा-अंधश्रद्धा असे काहीही असत नाही.

आपण जर नीट अभ्यास केला तर असे दिसेल की, कोणतीही गोष्ट आपल्याला दोन प्रकारे ऐकण्याची सवय असते. ऐकण्याची क्रिया पूर्ण होण्याआधीच आपल्या मनाने तिला संपूर्ण स्वीकार किंवा संपूर्ण नकार दिलेला असतो. खरे तर, ऐकणे ही एक कला आहे. आपण आपल्या आवडीने किंवा निवडीने ऐकतो. कोणतेही निष्कर्ष न काढता, स्मृतीच्या आधाराविना आपल्याला श्रवण करणे जमत नाही. धर्मशील मन हे कोणत्याही अधिकाराशिवाय आणि स्मृतीशिवाय काम करीत असते. ते निष्कर्ष काढत नाही. कोणत्याही पूर्वग्रहाशिवाय ते फक्त आकलन करीत असते.

धर्मशील मनाची सुरुवात आपण स्वतःला जाणण्यापासून करीत असतो. आपले संशयी, कंजूस, आत्मकेंद्रित मन परतत्त्वाला स्पर्शू शकत नाही. आपले विचार भीतीतून निर्माण झालेले असतात. या विचारांची मुळे भूतकाळात खोल रुतलेली असतात आणि भविष्यकाळात त्यांना फळे लागतील या खोट्या भ्रमात आपण जगत असतो. खरे तर, आपण जसे आहोत तसे पाहण्यातच स्वतःचा बोध होतो. मी वाईट आहे आणि मला चांगले व्हायचे आहे, या द्वंद्वात्मक भूमिकेतून विचारांचा गोंधळ निर्माण होतो. मी वाईट आहे, ही स्मृती भूतकाळाशी निगडित आहे आणि मला चांगले व्हायचे आहे, ही माझी भविष्यकालीन प्रस्तावित कृती आहे. त्यामुळे विचार करणारा आणि विचार या दोहोंत विलंबित काळ आहे व त्यामुळे पुन्हा गोंधळ उडण्याची शक्यता असते. विचार; कर्त्याला बाजूला ठेवून येणारा विचार हा धर्मशील मनाचा विचार असतो. उदाहरणार्थ, एखादा साप जर तुम्हाला अचानक दिसला तर त्या वेळेस तुम्ही जी तत्काळ कृती करता, तिच्या मागे विचारकर्ता उभा नसतो. फक्त विचार असतो. त्या वेळची तुमची कृती ही धर्मशील मनाची कृती असते. तिथे स्मृती आडव्या येत नाहीत. हातातल्या काठीने साप मारायचा का जीव वाचवण्यासाठी पळून जायचे, याचा निर्णय आपण कोणत्याही स्मृतीविना घेत असतो. खरे तर, हाच खरा धर्मशील मनाचा विचार आहे. आध्यात्मिक लोकांनी मानवी अस्तित्वाचे बाह्य व आंतरिक असे दोन विभाग पाडले आहेत; पण ते भ्रामक आहेत. धर्मशील मन हे मानवी अस्तित्वाचा विचार अखंडतेत शोधत असते. बाहेर जरी तुम्ही संन्याशाचा वेष घातला, तरी अंतर्यामी मात्र पूर्वीचेच असता. या ठिकाणी तुमच्या व्यक्तिमत्त्वात दुभंगलेपणा निर्माण होतो. अशा आंतरिक संघर्षामुळे माणसे मूर्ख आणि असंवेदनशील बनत असतात, असे कृष्णमूर्ती यांचे मत आहे. आपण असे समजतो की, स्मृतीचे व भूतकाळाचे संस्कार पुसून टाकण्यासाठी थोडा वेळ द्यावा लागेल. आपण त्या हळूहळू पुसून टाकू. कारण संस्कार एकदम विसरणे अशक्य आहे, अशी आपली धारणा असते. जे. कृष्णमूर्ती असे म्हणतात की, ज्या क्षणी आपल्याला कळते की, ज्या झेंड्याखाली आपण सर्वजण जमा झालो आहोत, तो झेंडा खोटा आहे, आभासी आहे, प्रतिमास्वरूप आहे, त्याच क्षणी आपली तथाकथित राष्ट्रीयत्वाची व संघटनेची पुटे गळून जातात आणि त्या ठिकाणी धर्मशील मनाचा जन्म होतो. म्हणून जे. कृष्णमूर्ती असे सांगतात की,





संस्कार पुसून टाकण्याची कृती प्रलंबित ठेवू नका; कारण मधल्या काळात जुन्या संस्कारांवर नवीन संस्कारांची पुटे चढण्याची शक्यता आहे. वर्तमानातल्या प्रश्नांची उत्तरे भूतकाळात जमा झालेल्या स्मृतीच्या आधारे शोधण्याचा प्रयत्न चुकीचा आहे.

धर्मशील मन हे कोणत्याही अधिकाराच्या व वर्चस्वाच्या भावनेपासून संपूर्णतः मुक्त असते. खरे तर, कोणत्याही वर्चस्वाच्या भावनेपासून मनाला मुक्त करणे, हे मोठे अवघड व जिकिरीचे काम आहे. त्यातही पारंपरिक वर्चस्वाच्या संस्कारी अनुभवाच्या स्मृतीतून मनाला मुक्त करणे ही अशक्य कोटीतील बाब असते. परंतु आपण ज्या धर्मशील मनाचा विचार करतो आहोत, त्यात कोणत्याही स्मृतीचा, श्रद्धेचा वा शिकवणुकीचा अंतर्भाव असत नाही. ओशो म्हणतात की, धर्मशील मनामध्ये वैज्ञानिक मनाचा समावेश होतो. वैज्ञानिक मन हे पूर्वग्रहापासून मुक्त असते. ते प्रयोगशील असते. म्हणजे ते एका वस्तुस्थितीकडून दुस-या वस्तुस्थितीकडे अलिप्त आकलनातून पुढे सरकत असते. पण ओशोंच्या मते वैज्ञानिक मन हे सर्वसमावेशक नसते. पण धर्मशील मन हे सर्वसमावेशकच असते. कारण ते कोणत्याही एका ठरावीक विचाराशी किंवा कृतीशी जोडले गेलेले नसते. डॉक्टर, अभियंता, वकील, प्राध्यापक तसेच कवी हे केवळ त्यांच्याच विषयापुरता विचार करून कृती करीत असल्यामुळे त्यांचे विषय आपोआपच संकुचित होतात व आपली सर्वसमावेशकता गमावून बसतात. या लोकांसाठी त्यांच्या विषयांशी निगडित कृती ही अतिशय महत्त्वाची असल्याने ती त्यांच्या प्रतिष्ठेचा विषय होते. अर्थात प्रतिष्ठा ही ठराविक लोकांची मक्तेदारी असल्यामुळे ती संकुचित असते. याउलट, धर्मशील मनाच्या कृतीचा प्रतिष्ठेशी काहीही संबंध असत नाही. कारण ती कृती ही संपूर्णतः पूर्वग्रहविरहित आणि कालातीत असते.

कोणत्याही अनुभवातून आपला समाज फारसे काही शिकत नाही. आर्थिक किंवा राजकीय क्रांतीद्वारे समाजात थोडेफार परिवर्तन होत असले, तरीही ते तात्पुरते असते. त्यामध्ये मूलभूतता असत नाही. याउलट, धर्मशील मन हे प्रेम आणि शांततेच्या स्फोटासारखे असते. पण ही शांतता सर्व प्रकारच्या प्रतिमा आणि विचारांपासून मुक्त अशा स्वरूपाची असते. त्यात कोणतेही पूवसूरींचे विचार किंवा पूर्वश्रद्धा असत नाहीत. ती शांततामय समाजजीवनाची मनोमन सुरुवात असते, जिथे साधकाच्या आत आणि बाहेर कोणताही संघर्ष उरलेला नसतो.

आपले मन हे अनेक जन्मांच्या स्मृतींशी निगडित असते. ओशोंच्या मते, पुनर्जन्म मानला तर अनेक जन्मांच्या वा अनेक युगांच्या आपल्या जैववांशिक अशा जनुकामार्फत पुर्वस्मृतींचा प्रवास अखंड चालू असतो. पण जे. कृष्णमूर्तींच्या मते केवळ याच जन्मातील स्मृतीसुद्धा माणसाला जन्मभर बांधून ठेवण्यास पुरेशा असतात व त्या त्याच्या मुक्ततेच्या मार्गातील अडसर बनून असतात. धर्मशील मन हे एक प्रज्ञाशील मन असते, असे जे. कृष्णमूर्ती म्हणतात. स्वतंत्र प्रज्ञा लाभलेला गौतम बुद्धासारखा अवतारी माणूस आपले विचार त्रिखंडांत पोचवू शकला; कारण त्याची प्रज्ञा ही या विचारप्रसारास अनुकूल व सक्षम होती. आपण सामान्य माणसे मात्र आपले सामान्यत्व कधीही विसरत नाही. खरे तर, सामान्य-असामान्य हे लौकिक सोयीसाठी माणसाने निर्मिलेले भेद आहेत, पण निसर्गाने पशू, पक्षी, प्राणी, कीटक किंवा वनस्पती यांच्यामध्ये असा कोणताही कृत्रिम भेद ठेवलेला नाही. अर्थात ही निसर्गाची प्रेरणा आहे. खरे तर सुरुवातीच्या काळात माणसामाणसांमध्ये भेद नव्हते. पण स्वतःच्या विश्लेषणात्मक बौद्धिक प्रक्रियेने माणसाने सर्व प्रकारचे भेद अस्तित्वात आणले. अलौकिक किंवा आध्यात्मिक प्रवासात माणसाने निर्मिलेले हे भेद आपला प्रवास अधिक दुस्तर व अवघड करून ठेवतात. आपण आपल्या सर्व विचारांच्या स्मृतींचा व दुःखांचा शेवट केल्यानंतरच करुणेचा जन्म होतो. करुणा ही वैश्विक स्वरूपाची व सर्व जीवसृष्टीविषयी संवेदनशील अशा प्रकारची असते. अशा दुःखरहित, स्मृतिरहित, विचाररहित करुणेचा आपल्या मनात उदय झाल्यानंतरच आपली प्रज्ञा जागृत होण्याची शक्यता आहे. याचा अर्थ करुणेशिवाय प्रज्ञेला वेगळे अस्तित्व असू शकत नाही आणि प्रज्ञायुक्त मन हेच केवळ धर्मशील मन असते, असे कृष्णमूर्ती म्हणतात. कारण ते कोणतेही निष्कर्ष

काढत नाही. एका क्षणापासून दुस-या क्षणापर्यंतचा त्याचा प्रवास स्मृतिशिवाय होत असतो आणि तोच खरा जीवनाचा प्रतिसाद आहे, असे कृष्णमूर्तींना वाटते. ते पुढे असेही म्हणतात की, प्रतिसाद हा अस्तित्वाच्या अखंडतेतून येतो, तर प्रतिक्रिया ही पूर्वस्मृतीतून येत असते व ती संकुचित असते. प्रतिसाद हा उत्स्फूर्त आणि जिवंत असतो आणि म्हणूनच धर्मशील मन असणारी माणसे स्वतंत्रपणे आणि स्वयंपूर्णतेने जीवनाला सामोरी जाऊ शकतात, असे कृष्णमूर्ती अधोरेखित करतात.

CCC



अनुक्रमणिका







# कवितेतील विकास आणि विस्तार*

(स्वरूप व विवेचन)

आनंद यादव

निसर्ग, समाज, मानवी जीवन, स्थल व काल यांच्याशी कलावंताच्या मनाचा आणि संवेदना-इंद्रियांचा सतत रासायनिक स्वरूपाचा संबंध येऊन अनुभव साचत असतात. या अनुभवांना न्याहाळतान्याहाळताच कलावंताच्या सौंदर्यानुभवांना प्रेरणा मिळून त्यांचा जन्म होत असतो. त्या सौंदर्यानुभवांना व्यक्त करण्याची ओढ म्हणजे कलावंताची निर्मितीची ओढ होय.

जीवनातील अनुभव घेण्याची त्याची पद्धती, त्याची क्षमता, अनुभवांतून सौंदर्यानुभवांची प्रेरणा घेण्याची त्याची कलात्मक कुवत इत्यादी गोष्टींवर त्याच्या सौंदर्यानुभवांचे स्वरूप अवलंबून असते. इथेच आणखी एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे की निसर्ग, समाज, मानवी जीवन, स्थल व काल, कलावंताचे मानवी मन, जीवनातील अनुभव घेण्याची त्याची पद्धती इत्यादी गोष्टींत बदल किंवा विकास झालेला असला व त्याच्या अनुषंगाने सौंदर्यानुभवांतही बदल किंवा विकास झालेला दिसला, तरी ह्या दोन गोष्टींत परस्परकार्यकारणाचा संबंध नाही, ही गोष्ट कटाक्षाने लक्षात ठेवली पाहिजे. कारण वरील गोष्टींत बदल किंवा विकास झालेला असूनसुद्धा सौंदर्यानुभवात बदल किंवा विकास झालेला दिसणार नाही किंवा याच्या उलट वरील गोष्टी त्याच असूनही सौंदर्यानुभवात बदल किंवा विकास झालेला दिसून येईल. सारांश, कलावंताच्या सौंदर्यानुभवांना स्वतंत्र अस्तित्व असते. या सौंदर्यानुभवांना कलावंताचे कलात्म मन जन्म देत असते. सामाजिक मानवी मन अशा वेळी मागे सरकलेले असते किंवा तटस्थ असते. हा सौंदर्यानुभव एकदा प्रेरणा घेऊन मोकळा झाला की त्याला त्याचे स्वतंत्र असे अस्तित्व प्राप्त होऊन तो आपला आकारही आपल्या प्राणतत्त्वानुसार घेऊ लागतो.

हा सौंदर्यानुभव कलावंत ज्या साधनांच्या साहाय्याने आभासात्म रूपात व्यक्त करू पाहतो, त्या साधनांच्या अभिव्यक्तिवैशिष्ट्यांवरही त्या सौंदर्यानुभवांचे मूळ रूप न्याहाळणे अवलंबून असते. शब्द आणि अर्थ ह्या निर्जीव साधनांच्या आधारे इथे चैतन्यरूप सौंदर्यानुभवांचा आस्वाद घ्यावा लागतो. कवितेवर हे जन्मतःच पडलेले बंधन आहे. म्हणून हा आस्वादही रसिक मनोमनच घेत असतो.

**विकासकल्पनेसंबंधी होणारी गफलत**

कवितेचे हे स्वरूप लक्षात आल्यावर तिचा विकास पाहणे सोपे जाईल, असे वाटते. आतापर्यंतच्या विकासाच्या समजुती ह्या लाकडी स्वरूपाच्या, ठोकळेबाज आणि कवितेचे मूळ स्वरूप लक्षात न घेणा-या वाटतात. 'संत--पंतांची कविता जुनी आहे. तिच्यात तत्कालीन जीवनाचे प्रतिबिंब नाही. केशवसुतांच्या कवितेत तत्कालीन समाजाचे व समाजमनाचे प्रतिबिंब पडले म्हणून त्यांची कविता आधुनिक. किंवा बालकवींनी निसर्गविषयक कवितेची व तांब्यांनी प्रेमविषयक कवितेची भर घातली', असे आपण म्हणतो आणि यालाच आपण कवितेचा विकास मानत आलो. कवितेला लावलेली जुनी-नवी, निसर्गविषयक, प्रेमविषयक ही विशेषणे सामाजिक स्वरूपाची आहेत. कलाक्षेत्रात ह्या विशेषणांना काहीही अर्थ नाही. ह्या विशेषणांमुळे एखादी कविता श्रेष्ठ किंवा कनिष्ठ, नवी किंवा जुनी कहीही ठरू शकत नाही. असे असतानाही ही विशषणे आपण आवर्जून वापरतो. याचाच अर्थ असा की, कवितेच्या विकासाच्या नावाखाली आपण त्या कवितेत दिसून येणा-या जीवन-स्थल-काळ-व्यक्तिसमाजसापेक्ष आशयाचा विकास पाहतो. ह्या आशयाचा विकास म्हणजेच कवितेचा विकास असे आपण आजपर्यंत मानले.

कवितेला अशा रीतीने 'सामाजिक अर्थ' देण्यात आणि त्याच्या अनुषंगाने विकास पाहण्यात जी आपण

***नवभारत** नोव्हेंबर १९६६ मध्ये प्रकाशित झालेला हा लेख पुनर्मुद्रित करत आहोत.

अनुक्रमणिका








गफलत केली, तशीच गफलत तिच्या दृश्य रूपाविषयीही आपण केली आहे आणि हे दृश्य, ठोकळेबाज, बाह्यरूप पाहणे व त्यातील बदल पाहणे म्हणजेच तिचा कलात्मक विकास पाहणे, अशीही आपण काही काळ समजूत करून घेतलेली दिसते आणि त्याच भूमिकेतून इंग्रजीमधून सुनीत उद्देशिका, फारशीमधून गज्जले आणण्याचा आपण गंभीरपणे प्रयत्नही केला. 'जुन्या कवितेची रचना दीर्घ होती, आधुनिक कविता स्फुट आहे. जुनी कविता संस्कृतमधून आलेल्या ठरावीक वृत्तांत होती, आधुनिक कवितेने विविध जाति-वृत्तांचा अवलंब केला. तिचे उपमा-रूपकांचे वळण बदलले', असे म्हणत असताना तिच्या टीकाकारांना तिच्या विकासाचीच दिशा निश्चित करायची होती, हेही आपण आजपर्यंत पाहिले. अशा रीतीने वेळोवेळी बदल झालेल्या व विकास पावलेल्या अभिव्यक्तीच्या साधनांचे व ती वापरण्याच्या पद्धतींचे ऐतिहासिक स्वरूप पाहणे म्हणजेच कवितेचा विकास पाहणे असे मत टीकाकारांनी करून घेतलेली दिसते.

कवितेचे अस्तित्व ह्या दोन घटकांच्याही पलीकडे असते, हे आपण लेखाच्या आरंभीच पाहिले. एखाद्या फुलाचा विकास पाहायचा असेल तर त्याच्या मूळ द्रव्यात (Matter) कसकशी भर पडत गेली, हे पाहणे म्हणजे त्या फुलाचा सर्व विकास पाहणे नव्हे किंवा त्याला निर्माण करण्याच्या पद्धतीचा विकास म्हणजेही काही त्या फुलाचा विकास नव्हे, हे आपल्या ध्यानात येते. फुलाला अंतर्गत असा एक विकास असतो. त्याच्या कळीच्या जन्मापासून तो त्याचा फूल होण्यापर्यंतच्या अवस्थेचे टप्पे पाहणे हा त्याचा खरा विकास पाहणे होय. बाकीच्या गोष्टी ह्या त्याचे माहितीसाठी केलेले विश्लेषण होत. कवितेच्या बाबतीतही असेच म्हणावे लागेल. ती काही आशय व्यक्त करण्याचे केवळ साधन किंवा यांत्रिक पद्धतीची निर्जीव निर्मितीही नाही आणि याच कारणांमुळे तिचा तिला असा एक अंतर्गत विकास असतो.

**'विकासात' गुणात्मक समृद्धी होत असते**

तिचा हा विकास पाहण्यासाठी प्रथम तिचे नेमके स्वरूप लक्षात आले पाहिजे.– खरेतर कागदावर लिहिलेली कविता ही कलावंताच्या मनातील मूळ कवितेचा आभास असते आणि ह्या आभासाच्या आधाराने तिचा रसिक आपल्या मनात कविता अनुभवीत असतो. – कवितेच्या अस्तित्वाचे स्वरूप हे असे असल्याने तिच्या विकासाचे स्वरूप ह्या दोन मनांतच (कलावंताच्या आणि रसिकाच्या) पाहावे लागते आणि ते तसे सापडूही शकते, असे मला वाटते.

पु. शि. रेगे म्हणतात की, कविता ही अनुभवांचा आविष्कार नसून ती अनुभवांचा शोध असते. त्यांचे हे म्हणणे माझ्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे आहे. हा सौंदर्यानुभवांचा शोध कलावंताचाही चाललेला असतो आणि रसिकांचाही चाललेला असतो. संतांचे आध्यात्मिक अनुभव असलेले अभंग, टागोरांची गीतांजली, बालककवींची निसर्गविषयक सौंदर्यानुभव व्यक्त करणारी कविता, माधव ज्यूलियन यांचे विरह-तरंग, इंदिराबाईंची 'मेंदी' मधील विरह-व्यथेतून प्रेरणा घेणारी कविता ह्या कवींच्या ह्या कविता म्हणजे दुसरेतिसरे काही नसून त्यांना आलेल्या एका मूलगामी सौंदर्यानुभवाचा सतत चाललेला शोध असतो आणि त्यांच्या त्यात्या संग्रहातील तद्विषयक कविता म्हणजे त्या मूलगामी सौंदर्यानुभवाचाच शोध घेणा-या त्या कलाकृती असतात. कलावंताच्या दृष्टीने त्याच्या त्या मनातील मूळ कवितेचाच तो विकास आहे. त्या त्या संग्रहातील त्या त्या कविता म्हणजे मूळ कवितेच्या अनेक अवस्था आहेत.

रसिकाच्या दृष्टीने विकासाची प्रक्रिया अशीच चाललेली असते. फरक एवढाच असतो की, कलावंत मूळ सौंदर्यानुभवाचे प्रतिबिंब लिखित कवितेत पाहण्याचा प्रयत्न करीत असतो आणि त्याच प्रतिबिंबाच्या आधाराने तो मूळ सौंदर्यानुभव अनुभवण्याचा प्रयत्न करतो. रसिकही लिखित स्वरूपातही आभासात्म कवितेच्या आधाराने मूळ सौंदर्यानुभव अनुभवण्याचा प्रयत्न करीत असतो. लिखित स्वरूपातील ही कविता निरनिराळ्या स्थळकाळांत रसिकाकडून अनुभवली जात असतो. रसिकाच्या अनुभव घेण्याच्या कुवतीत भर पडत गेली असण्याची शक्यता असते. त्यामुळे काळाच्या व रसिकाच्या अनुभव घेण्याच्या कुवतीच्या ओघात त्या कवितेचा अनुभव विविध त-हांनी येत असतो. काळाच्या संदर्भात कवितेचा होणारा हाच खरा विकास होय; असे मला वाटते. प्रत्येक कविता

अनुक्रमणिका

अशा त-हेने काळाच्या संदर्भात जगत असते आणि विकास पावत असते. काळाच्या संदर्भात तिच्या रसिकाच्या मनावर होणा-या अनुभवयुक्त प्रक्रिया नमूद करणे म्हणजेच तिच्या विकासाचा खरा इतिहास लिहिणे, असे माझे मत आहे.

याप्रमाणे उपलब्ध सर्व कवितांचा अंतर्गत विकास काळाच्या संदर्भात आपआपल्या परीने चाललेला असतो. एकाच काळात ज्ञानेश्वरांची, मुक्तेश्वरांची, केशवसुतांची आणि मर्ढेकरांचीही कविता वाचली जात असते. म्हणजे या सर्वच कविता एकाच काळात जगत असतात. म्हणून ज्ञानेश्वरांपासून ते मर्ढेकरांपर्यंत कवितेच्या जन्मकाळाच्या क्रमानुसार जो आढावा घेतला जातो आणि त्यालाच कवितेच्या विकासाचा आढावा म्हटले जाते, ही गोष्ट चुकीची वाटते. कारण एकाच काळी ज्या अर्थी ह्या सर्वांच्या कविता अस्तित्वात आहेत आणि जगत आहेत व त्या रसिकांकडून अनुभवल्याही जात आहेत, त्या अर्थी त्या अजून विकास पावत आहेत.

आणि दुसरी गोष्ट अशी की, ज्ञानेश्वरांपासून आजपर्यंत जी नवनवी कविता लिहिली जात आहे, ती प्रत्यक्ष अशा रीतीने स्वतंत्र रीत्या जगत असल्याने संख्येच्या दृष्टीने विस्ताररूप आहे. ज्ञानेश्वरांनंतर मुक्तेश्वरांची कवितेत पडलेली भर किंवा केशवसुतांनंतर मर्ढेकरांसहित इतरांची पडलेली भर ही संख्यारूप आहे. ज्ञानेश्वरकालीन जन्माला आलेल्या कवितेचा किंवा केशवसुतकालीन जन्माला आलेल्या कवितेचा तो विकास नव्हे; विस्तार आहे. काळाच्या संदर्भात लोकसंख्या वाढत जाते, म्हणून तिला आपण माणसाचा विकास म्हणत नाही; विस्तार झाला असेच म्हणत असतो. विस्तारात वस्तूंची संख्यात्मक समृद्धी असते, तर विकासात गुणात्मक समृद्धी होत जात असते.- हळूहळू हा कवितेचा विस्तार वाढत जाणार आणि ह्या विस्ताराचाही हळूहळू आपआपल्या परीने विकास होत जाणार.

उदाहरणाने ही गोष्ट अधिक स्पष्ट होईल, असे मला वाटते. - माझ्या समोर चार चांगल्या कविता वाचण्यासाठी पडलेल्या आहेत. मला ह्या कविता कोणत्या काळात जन्माला आल्या, हे ठाऊक नाही. त्यांचा कालक्रमही ठाऊक नाही. मी फक्त आस्वादकच आहे आणि मी ह्या चार कविता वाचल्या. चारीही कवितांनी मला सौंदर्यानुभवाचा प्रत्यय दिला. पण ह्या चार कवितांतील सौंदर्यानुभव त्यांच्यात्यांच्या परीने वेगवेगळा आहे. त्यांची चव वेगवेगळी आहे. सारांश, ह्या कवितांचा स्वभाव वेगवेगळा आहे. ह्या कवितांचा कविता म्हणून माझ्यातील आस्वादकाने आस्वाद घेतल्यानंतर सौंदर्यानुभवाच्या अनुषंगाने त्यांचा कालक्रम ठरविण्याचा प्रयत्न केला, तर तो अशक्य कोटीतला वाटला. माझ्यातील आस्वादकाला फक्त एवढेच कळते की, ह्या कवितांचा स्वभाव वेगवेगळा आहे. तरी त्या आपआपल्या स्वभावानुसार मला सौंदर्यानुभवाचा प्रत्यय देतातच आणि एवढ्यावरून एक दुसरीचा विकास आहे, हे मला ठरविणेच अशक्य होते. मला त्याची जरूरीही वाटत नाही. आस्वादात त्यामुळे कुठे अडथळाही आला नाही आणि मग मला नंतर माहिती कळाली की, एक कविता ज्ञानेश्वरकालीन, दुसरी पेशवेकालीन तर तिसरी केशवसुतकालीन व चौथी मर्ढेकरकालीन आहे आणि केवळ त्या वेगवेगळया काळांत जन्माला आल्या म्हणून एक दुसरीचा विकास आहे, हे म्हणणे मला कळत नाही. म्हणून पटत नाही. म्हणून मला असे म्हणावेसे वाटते की, ज्ञानेश्वरकालीन कवितेचा जो स्वभाव होता, त्याच्यापेक्षा वेगळ्या स्वभावाची केशवसुतकालीन कविता आहे. मर्ढेकरांची कविता त्यांच्यापेक्षा वेगळ्या स्वभावाची आहे आणि ह्या वेगवेगळया स्वभावाच्या कविता आज एकत्र गुण्यागोविंदाने जगत आहेत.

**विकासासंबंधीची रूढ कल्पना कशी अस्तित्वात आली असावी?**

मग आतापर्यंत विकासाविषयाची जी रूढ कल्पना आहे, ती तशी दृढ होण्याचे कारण तरी काय, असा प्रश्न मनाला छळत राहतो आणि विचार करता मला त्याचे उत्तर सापडते ते असे : तात्त्विक दृष्ट्या 'नवीनता' हे वाङ्मयीन मूल्य मानले गेले नसले, तरी कालाने बद्ध असलेल्या टीकाकारांच्या सुप्त मनामध्ये त्याची कुठेतरी वसती असावी आणि त्यामुळेच केशवसुतांची कविता वेगळी मानण्यापेक्षा ती काळाच्या संदर्भात नवीन वाटल्याने तिने पूर्वीच्या कवितेच्या तुलनेने विकास साधला असे म्हणण्याचा मोह होत असावा, असे वाटते. दुसरे कारण

असे दिसते की, नाही म्हटले तरी कवितेला मुळात निर्जीव वस्तू मानल्यामुळे रूढ कल्पना दृढ झाली असावी. कारण कवितेला एखादी निर्जीव वस्तू एकदा मानले की, मग तिच्यात नव्या मूल्यांची भर पडली, कविता स्फुट झाली, सुटसुटीत झाली, जास्त परिणामकारी झाली, असल्या प्रकारची भाषा सुरू होते. – कारखान्यात तयार होणा-या निर्जीव वस्तूंमध्येही अशीच एखाद्या नव्या घटकाची भर पडते. ती वस्तू वापरायच्या दृष्टीने जास्त सुटसुटीत आणि उपयोगाच्या दृष्टीने जास्त परिणामकारक होत असते. तिसरे एक कारण असे दिसते की, कवितेला भावनाविष्काराचे 'साधन' मानल्याने विकासाविषयीची तिची रूढ कल्पना दृढ झाली असावी. आविष्काराच्या दृष्टीने ह्या साधनात जितक्या सोयी जास्त होतील तितकी त्या साधनाची प्रगती झाली, म्हणजेच कवितेचा विकास झाला, असे मानले गेले की, ही भूमिका आपोआपच अपरिहार्यपणे तयार होते आणि मग नवनव्या स्वरूपांच्या भावनांच्या आविष्काराच्या अनुषंगाने आपण तिचा विकास ठरवू लागतो. पण कवितेकडे एक चैतन्यरूप नवनवोन्मेषशाली सौंदर्यानुभव देणारी म्हणून जर आपण पाहू लागलो, तर वरील कल्पना आपोआप निखळून पडते.

या विचारांच्या अनुषंगाने कवितेच्या रसिकाला शेवटी एकच विनंती करावी असे वाटते की, निर्भेळपणाने कवितेचा आस्वाद घ्यावयाचा असेल, तिच्यातील तिचे असे स्वतंत्र सौंदर्य अनुभवण्याची जर मनापासून इच्छा असेल, तर ती कविता कोणत्या काळातील, कोणत्या कवीची किंवा कोणत्या कवीच्या कवितेनंतरची या गोष्टींची आठवण ठेवण्याची मुळीच गरज नाही. कलाकृतींच्या आस्वादाच्या संदर्भात या गोष्टींची काडीचीही गरज नसते. आस्वादकालीन मनाने आपल्यावरील ही टरफले जर काढून टाकून ते मेणासारखे पूर्णपरिणामग्राही झाले तर त्या कलाकृतीचा निखळ आणि शुद्ध स्वरूपात आस्वाद घेता येईल. मग अशा वेळी केशवसुतांच्या कवितेपेक्षा रविकिरणमंडळकालातील कविता जास्त सौंदर्यलक्षी वाटली, तर वाटू द्या. केवळ मर्ढेकरांच्या नंतर पाडगावकरांनी कविता लिहिली म्हणून ती कमी दर्जाची, असे मानण्याचे मुळीच कारण नाही किंवा केवळ एवढ्याचसाठी मर्ढेकरांची कविताही चांगल्या दर्जाची असे मानण्याचेही काहीच कारण नाही. निखळ व कालनिरपेक्ष स्वरूपातील मिळणारा सौंदर्यानुभव हाच त्या त्या कवितांचा दर्जा ठरवू शकेल. काळाच्या संदर्भात झालेला त्यांचा जन्म नव्हे.

(२१ जुलै १९६६ रोजी साहित्य परिषद, पुणे येथे 'साहित्य-चर्चा' मंडळात वाचलेला निबंध.) CCC

अनुक्रमणिका

# जुने लेखन

मराठ्यांची अशी कर्तबगारी असतां किंवा त्यांच्या अंगीं सुप्त असे गुण बरेच असतां, त्यांचा उपयोग कां झाला नाहीं हा प्रश्न पडतो. परंतु कित्येकांना प्रथमतः मराठ्यांत सध्यां कांही दुर्गुण दिसत नाहींत, त्यांची सर्वथा प्रगती होत असल्याचें त्यांना वाटतें. हें निश्चितपणें ठरवितां येणें शक्य आहे त्यासाठीं कांहीं आडाखे साधारण मानानें ठरविल्यास गैर नव्हे. कुठल्याही समाजांतील स्वावलंबन, संपन्नता, विद्याप्रसार, विचारी पुरुष, घटकांचें सहकार्य, व्यापक वृत्ति – एवढ्या बाबींवरून त्या समाजाची प्रगति होत आहे का अधोगति हें सांगतां येतें. म्हणजे समाज ज्या मानानें स्वावलंबी असेल, संपन्न असेल, त्यांत विद्याप्रसार झाला असेल, त्यांत विचारी पुरुष असतील, निरनिराळ्या घटकांत सलोखा असेल, त्यांत चढाऊ वृत्ती असेल, त्या मानानें तो समाज प्रगतीच्या मार्गावर आहे असें म्हणावयास प्रत्यवाय नसावा. स्वावलंबी याचा अर्थ असा कीं, समाजोपयोगी अशीं उच्च नीच दर्जाचीं सर्व कामें स्वतंत्रपणें करणें. त्याचें समाजचक्र चालविण्यास अन्य प्रेरकांची किंवा प्रेरणेची जरूरी नसते आणि समाजांत ऐतखाऊंचा भरणा नाही. काम करतां येणारी सर्व मंडळी निदान पोटापुरतें मिळवीत आहेत. असा समाज स्वावलंबी म्हणतां येतो. मारवाडी लोकांचें उदाहरण स्वावलंबी म्हणून देतां येईल. संपन्न समाजाचा अर्थ तर स्पष्ट आहे. समाजांतील होतकरूंना कार्यमग्न ठेवण्यास, किंबहुना त्यांना शिक्षण देण्यासही, संपत्तीची आवश्यकता आहे. म्हणून धनोत्पादक धंदे, व्यापार, अशांत समाज जितका अधिक गुंतून राहील तितकें उत्तम. कारण समाजाच्या संपन्नतेवरच त्याचे इतर सर्व गुण अवलंबून रहातील. गुजराथी किंवा पारशी समाजाचें उदाहरण संपन्न म्हणून देतां येईल.

समाजाच्या सर्व घटकांत विद्याप्रसार सारखा व्हावयास हवा. एका वर्गात शिक्षणाचें अजीर्ण व बाकीच्या विभागांना कडकडीत उपवास असें असणें केव्हांही इष्ट नव्हे. पारशी किंवा ख्रिस्ती समाजांत विद्येचा प्रसार अधिक झालेला आढळतो. जरा दूरचें उदाहरण घ्यावयाचें तर ब्रह्मी समाजांत साक्षरता सार्वत्रिक आहे असें म्हणतां येतें. अर्थात् नुसत्या साक्षरतेवरच समाजाच्या सांस्कृतिक तयारीचें मान ठरवितां येणार नाहीं. पण विद्याप्रसाराचें तें एक किमान लक्षण आहे एवढें खरें.

समाजांतील विचारी पुरुषांवर तर नियंत्रणाचें काम पडत असल्यानें त्यांची किंवा त्यांनीं घालून दिलेल्या शिस्तीची महति अधिक. महाराष्ट्रांत रानडे, टिळक...गोखले... अशीं विचारी माणसें आधुनिक कालांत झालीं म्हणून महाराष्ट्राकडे परप्रांताचें किंबहुना परदेशांचेंही लक्ष वेधलें.

समाजांतील निरनिराळ्या घटकांत पूर्ण सहकार्य पाहिजे. एवढेंच नव्हे तर, सर्व घटकांच्या कर्तबगारीसही भरपूर वाव मिळाला पाहिजे. नाहीं तर, 'स्त्रियो वैश्यास्तथा शूद्राः' यांना दडपून ठेवलें असल्यास त्या समाजाची कार्यक्षमता कमी राहील. त्यांत स्वावलंबन येणार नाहीं.

सध्यांच्या चढाओढीच्या दिवसांत आणि व्यापारी युगांत चढाऊ वृत्ती नसेल तर जगणें अशक्य होऊन बसलें आहे. म्हणून नुसतें आपल्यापुरतें पाहून भागणार नाहीं. किंबहुना इतरत्र सर्वत्र चालू असलेला लुटालुटीचा धंदा (अर्थात लुटीचा प्रकार सध्यां अगदीं निराळा आहे) पहातां, कुठल्याही एका समाजानें त्यापासून अलिप्त रहाणें म्हणजे 'आपुल्या मरणाचा सुखसोहळा पहाण्यासारखें' होय. युरोपियन राष्ट्रांचें जीवनच मुळीं चढाऊ वृत्तीवर–त्यांच्या आक्रमणावर–अवलंबून आहे. पण त्यांचें उदाहरण घेण्यापेक्षां हिंदुस्थानांतील मारवाडी, शीख, पठाण....वगैरे किती तरी समाजांचें देतां येईल. फार कशाला, मराठ्यांचा इतिहास त्यांच्या चढाऊ

सध्यांच्या चढाओढीच्या दिवसांत आणि व्यापारी युगांत चढाऊ वृत्ती नसेल तर जगणें अशक्य होऊन बसलें आहे. म्हणून नुसतें आपल्यापुरतें पाहून भागणार नाहीं.

अनुक्रमणिका






किंबहुना इतरत्र सर्वत्र चालू असलेला लुटालुटीचा धंदा (अर्थात लुटीचा प्रकार सध्यां अगदीं निराळा आहे) पहातां, कुठल्याही एका समाजानें त्यापासून अलिप्त रहाणें म्हणजे 'आपुल्या मरणाचा सुखसोहळा पहाण्यासारखें' होय. युरोपियन राष्ट्रांचें जीवनच मुळीं चढाऊ वृत्तीवर-त्यांच्या आक्रमणावर-अवलंबून आहे. पण त्यांचें उदाहरण घेण्यापेक्षां हिंदुस्थानांतील मारवाडी, शीख, पठाण....वगैरे किती तरी समाजांचें देतां येईल. फार कशाला, मराठ्यांचा इतिहास त्यांच्या चढाऊ वृत्तीखेरीज बनला काय? हा प्रश्न विचारून पहावा म्हणजे काय तें समजेल. अस्तु.

आतां ह्या सर्व कसोट्या मराठी समाजास लावून पाहूं. पहिली बाब स्वावलंबनाची. महाराष्ट्रांत परप्रांतीयांनी येऊन निरनिराळे नित्योपयोगी व्यवसाय आरंभिले व म्हणून मराठे बेकार राहूं लागले ही तक्रार गेल्या दहा-पंधरा वर्षांत पुष्कळ ठिकाणीं आली आहे. त्यांचीं उदाहरणेंही अनेकांनीं अनेक दिलीं आहेत. महाराष्ट्रांत शेतक-यांचा सावकार, दुकानदार, अडत्या, व्यापारी....हे सर्व महाराष्ट्रीयेतर आहेत. इतकेंच काय, पण महाराष्ट्रांतील स्वयंपाक तेलंगी ब्राह्मणांकडे, रखवालीचें काम गुरखे किंवा पुरभय्ये यांजकडे. अशा लहानसहान बाबींतसुद्धां परकीयांनीं आक्रमण केलेलें आहे, म्हणून ओरड बरीच होते. पेशवाईपासून चालत आलेली पिढीजात कारकुनीसुद्धां मद्रदेशवासी हिरावून नेत आहेत. या सर्वांचा अर्थ एक – महाराष्ट्रीय समाज स्वावलंबी नाहीं. कित्येक क्षुल्लक गोष्टींत सुद्धां त्यास अन्य समाजाकडे पहाण्याची पाळी येते.

महाराष्ट्रांतील प्रमुख जिल्ह्यांत मुंबई इलाख्याबाहेरून आलेल्यांचे स्थानिक लोकसंख्येशीं प्रमाण असें पडतें:-

| | | | |
|---|---|---|---|
| पुणें | १२.७% | पूर्व खानदेश | ७.२% |
| नाशिक | ७.३% | पश्चिम खानदेश | ७.८% |
| सोलापूर | १३.६% | ठाणे | ८.३% |
| अहमदनगर | ७.७% | | |

म्हणजे जिल्ह्यांतील दर शंभर माणसांमागें इतके लोक परप्रांतीय आहेत! पुणें, सोलापूर, ठाणें, नगर, प. खानदेश येथील प्रमाण विचारणीय वाटतें. इतकी महाराष्ट्रीय मंडळी तरी मुंबई इलाख्याबाहेर गेली आहेत काय याचा अंदाज मनाशीं बांधावा.

महाराष्ट्रांत बेकारी फार माजली असल्यानें व हा प्रदेशही दुष्काळी असल्यानें एका मिळवत्या हातावर अवलंबून असणारी खाणारीं तोंडेंही पुष्कळ आहेत. त्या दृष्टीनें आमचा समाज स्वावलंबी नाहीं असें दिसतें. देशावर दर हजारीं ६३२ लोक ऐदी – म्हणजे बसून खाणारे, परावलंबी – आहेत. गुजराथेंत अशा लोकांचें प्रमाण ५६७ आहे. गुजराथेंतील श्रीमंती व तेथील बायकांची घरीं रहाण्याची संवय लक्षांत घेतली, तरीही ऐतखाऊ त्यांच्या समाजांत फार नाहींत हें उघड होतें.

संपन्नतेच्या दृष्टीनें मराठी समाजावर निसर्गाचीच मुळीं अवकृपा. ती भरून काढण्यासाठीं मराठशाहींत आक्रमणवृत्ती वाढून महाराष्ट्रांत कांहीं काल संपत्ती पुष्कळ खेळली. पण ती टिकवून ठेवण्याचें कसब मराठ्यांना नसल्यानें मराठे पुनः कोरडे ते कोरडेच राहिले. आज किती तरी समाज संपन्न होत आहेत. पण महाराष्ट्राची त्या मार्गानें प्रगती अगदीं मंदगतीनें होत आहे. धनोत्पादक धंद्यांत महाराष्ट्रीय मंडळी फारशी पडत नाहींत. धनोत्पादक उद्योग याचा अर्थ लोकांची उत्पादनशक्ती वाढविणारे धंदे असा केला पाहिजे. या दृष्टीनें थोडेंसें निरीक्षण केलें तर महाराष्ट्रांत धनोत्पादक धंदे फार थोडे आहेत असें दृष्टोत्पत्तीस येईल.

धंदा–मग तो कुठलाही असो–नेकीनें, व्यवस्थेनें व धोरणानें केला कीं संपत्ती मिळालीच पाहिजे, हा सर्वसाधारण नियम समजावा. खाद्यपेयांचे धंदे महाराष्ट्रांत पुष्कळ असले तरी परप्रांतांत जाऊन ते चालविण्यांत अधिक मातब्बरी आहे. नाहीं तर आपल्या घरीं व्यापार करण्यासारखा तो पोरखेळ होईल. धनोत्पादक धंदे महाराष्ट्रांत फारसे नाहींत; पण चैनीच्या व तूर्त तरी अनावश्यक अशा धंद्यांकडे बरेच लोक ओढले गेल्याचें स्पष्ट दिसतें.

"...सांपत्तिक दृष्ट्या महाराष्ट्र गरीब असला तरी रसिक व गुणग्राहक आहे. तो एक वेळ खाण्यापिण्यांत काटकसर करील, पण नाटक–सिनेमासारख्या करमणुकीच्या साधनांना हटकून आश्रय देईल! याचें प्रत्यंतर महाराष्ट्रांतील ६० सिनेमागृहें आणि २५-३० नाटक कंपन्या देतील. शिवाय तमाशांची संख्या निराळी



अनुक्रमणिका

आहेच.....एकूण सिनेमा, नाटकें आणि तमाशे यांची संख्या जेवढी महाराष्ट्रांत आहे, तेवढी हिंदुस्थानांतल्या कोठल्याही सधन व सुधारलेल्या भागांतही नाहीं."*

ही बढाई खरी आहे. पण वास्तविक बढाई मारण्यासारखें यांत कांहीं नसून उलट विचार करण्यासारखी स्थिती ह्या विधानांत स्पष्टपणें दृग्गोचर होते. रसिकता किंवा गुण–ग्राहकता यांना संस्कृतींत महत्त्व नाहीं असें नाहीं. परंतु इतर अवयव पुष्ट न करतां एकाची वाढ होऊं देणें जसें अनिष्ट, तद्वत् धनोत्पादक धंद्यांची तरतूद न करतां समाजाला रसिक व गुण-ग्राहक होऊं देणें अनिष्ट होय. इतर प्रांतांत नाहींत इतक्या नाटकमंडळ्या, महाराष्ट्र गरीब असूनही महाराष्ट्रांत आहेत, ही आमच्यांत ललितकलेची वाढ दर्शविणारी प्रौढीची बाब आहे खरी, पण भौतिक शास्त्रें, उद्योगधंदे, व्यापार, शिक्षण...इत्यादी शाखा, कीं ज्यावर समाजाची खरीखुरी समृद्धता व संपन्नता अवलंबून असते, त्याकडे लक्ष न देतां, सिनेमा, नाटकें वाढवीत बसणें हें अनाठायीं मेहनत खर्च करण्यासारखें होय. हा विचार समाजांतील मार्गदर्शकांस सुचला किंवा नाहीं तें समजत नाहीं. पण अधिकारवाणींने कोणी याबद्दल भयसूचक इशारा दिल्याचें आढळत नाहीं. नाटक कंपन्या ह्या ख-या व्यापक अर्थानें धनोत्पादक होऊं शकतात. पण सध्यांतरी त्या पैसे खेळविणा-या मंडळ्या आहेत. स्वदेशी सिनेमांना बाहेरच्या प्रांतांतून महाराष्ट्रांत पैसा आणण्यास वाव बोलपटामुळें पूर्वीपेक्षां कमी झाला असला, तरी नाटक मंडळ्यांपेक्षां त्यांना धनोत्पादक—बाहेरचा पैसा आणतां येतो म्हणून—म्हणतां येतें. शिवाय नाटकें काय किंवा सिनेमा काय, दोन्हीही करमणुकीचीं साधने अत्यल्प शहरवासीयांपुरतींच आहेत; शेतकरी वगैरे ख-या बहुजनसमाजाचा त्यांच्याशीं फारसा संबंध येत नाहीं, हीही एक बाब लक्षांत ठेवली पाहिजे. शिक्षणप्रसारास सिनेमाची मदत पुष्कळ होण्यासारखी आहे. परंतु प्रस्तुतचें त्याचें स्वरूप शुद्ध करमणुकीचें आहे व ती करमणूकही अल्पसंख्याक अशा शहरवासीयांची होय. ह्या गोष्टींचा विचार केल्यावर सिनेमा-नाटकांबद्दल महत्त्व विशेषसें वाटत नाही.

*केसरी, टिळक-अंक पृ. ५५

ही संपन्नता महाराष्ट्रास नसल्याकारणानें महाराष्ट्रीय समाज स्वावलंबी नाही. विद्येचा प्रसार पाहिला तर समाधानास थोडी जागा आहे खरी, पण त्यामुळें विषमता अधिक वाढत आहे. शिक्षण मिळतें त्यांस १०-१२ वर्षें मिळतें व तें एकाच लहानशा विवक्षित वर्गास लाभतें आणि बाकीचे निरक्षर रहातात इतकेंच नव्हे, तर शिक्षितांत व त्यांत दुर्लंघ्य अशी दरी उत्पन्न होते. कित्येक वेळीं तर गरीबांना लुबाडण्याकडे त्या शिक्षणाचा उपयोग होऊन समाजांत हे घटक परस्परपोषक न बनतां शोषक होतात.

विचारी पुरुषांबद्दल अधिक काय लिहावें! विचारकर्त्यांच्या विचारांची विस्तृत छाननी ह्या पुस्तकांत झाली आहे. त्यावरून महाराष्ट्रीय समाजांत अव्वल दर्जाचे कांहीं विचारी पुढारी होऊन गेले हें दिसतें खरें;–पण सध्यां त्यांच्या तोडीस येणारा कुणी आहे काय? असा मनाशींच प्रश्न केल्यास उत्तर देतांना मोठी पंचाईत पडते.

नंतरची कसोटी सहकार्याची. समाजांतील भिन्न घटकांत सहकार्य आहे असें मराठी समाजापुरतें तरी म्हणतां येत नाहीं. ब्राह्मण-अब्राह्मण किंवा स्पृश्यास्पृश्य हे विरोध त्यांत आहेत म्हणूनच सहकार्य नाहीं असें नव्हे, तर इतरही पुष्कळ भेद-तट त्यांत पडले असून त्यांच्यांतील स्पर्धेस अनिष्ट व अहितकर वळण प्राप्त झालें आहे. इंग्लंडमधील राजकीय पक्षोपपक्षांतही चुरस असते; स्पर्धा रंगते, वाद माजतात; पण ती स्थिती महाराष्ट्रीय समाजाची नाहीं हें स्पष्ट दिसतें. पक्षाभिमानाचें रूपांतर वैरांत होतें असा इथला प्रकार आहे. सार्वजनिक संस्थांच्या इतिहासांतही सहकार्याचें प्रत्यंतर विशेषसें सांपडत नाहीं.

शिवाय शिक्षित वर्गाला बहुजनसमाजाची काडीइतकीही काळजी नसल्याचें प्रत्यंतर चळवळींत, वादविवादांत आणि वाङ्मयांत आढळतें. त्यामुळें शिक्षितांचे जग निराळें व अशिक्षितांचें निराळें, अशी परिस्थिती निर्माण झाली आहे. शहरांत रहाणारे व खेड्यापाड्यांत वस्ती करणारे असेही पाहिजे तर हे दोन प्रकार मानावे. त्यामुळें समाजांतील घटकांत सहकार्य होणें मुष्कील झालें आहे. महिलांच्या 'जगा'कडे लक्ष देणें ही एक अलिकडे फॅशन ठरली असल्यानें तो घटक अलिप्त

नाहीं हें खरें; पण केवळ शहरवासी शिक्षितांपुरती ही दृष्टी झाली. खेडेगावांत राहणा-या बहुजनसमाजांतील स्त्रिया बहिष्कृतच आहेत.

राहातां राहिला प्रश्न व्यापक वृत्तीचा. एके काळीं मराठ्यांच्या ह्याच गुणाची भीती अखिल हिंदुस्थानभर वाटत असे. तो गुण सध्यां आम्हांस अगदीं सोडून गेलेला दिसतो. इतर प्रत्येक प्रांतांतील मंडळी अन्य प्रांतांत जाऊन वसाहत केल्याप्रमाणें स्थायिक होतात; व्यापारउदीम, नोकरीधंदा करतात. पण आमच्या महाराष्ट्राला मात्र असल्या व्यापकवृत्तीचें वावडें दिसतें.''सध्यांची आर्थिक परिस्थिती लक्षांत घेतल्यास महाराष्ट्राची लोकसंख्या, आहे तीसुद्धां, जास्तच आहे" अशी आंकड्यानिशीं कबुली 'केसरी'नें दिली आहे; तरीही बाहेर वसाहतीसाठीं जाण्याचा किंवा दृष्टी व्यापक करण्याचा विचार त्यांच्या कक्षेत आला नाही, हें आश्चर्य.

समाजस्थितीची व्यापक दृष्टीनें पहाणी करून विशिष्ट योजनेनुसार पुनर्घटना करण्याचें काम कोणी करत नाहीं. कांहीं विशिष्ट क्षेत्रांतच आजीव कार्यरत रहाणारी मंडळी महाराष्ट्रांत आहे. तेवढ्यानें समाजांतील एका अंगाचा प्रश्न सुटण्यास मदत होते. पण नव्या पिढीच्या अंगी कोणते गुण आहेत, कोणत्या गुणांची वाढ तेथें व्हावयास पाहिजे, ती कशी करावी...इत्यादी महत्त्वाच्या प्रश्नांकडे मराठी समाजांचे लक्षं दिसत नाहीं. उलट, नव्या व जुन्या पिढींतील तेढ वाढत आहे, दोहोंमध्यें असणारी दरी विस्तारत आहे, असें दिसतें. त्यामुळे एकंदर समाजाची प्रगती न होतां हानी होत रहाते, त्याची वाट काय? आमच्या समाजाचीं स्थित्यंतरें कोणत्या विचारानुसार घडत आलीं, त्यांत विचाराला कितपत महत्त्व होतें, आज महाराष्ट्रीय समाज कोणत्या दिशेनें चालला आहे....इत्यादी गोष्टी अभ्यासणें मनोरंजक आणि उपयुक्त ठरेल. म्हणून मराठशाहींतल्या मुख्य मुख्य घडामोडींचा विचार करून नंतर गेल्या शंभर वर्षांतील प्रमुख विचारवंतांच्या कामगिरीचें निरीक्षण केलें आहे.

---

**टीप** : 'आजकालचा महाराष्ट्र' या प्रभाकर पाध्ये व श्री. रा. टिकेकर यांनी संपादन केलेल्या ग्रंथातून. प्रकाशन वर्ष १९३५.

CCC

## लेखकांचा परिचय

 **प्रा. डॉ. लक्षटे रत्नाकर बाबूराव**

पदवी व पदव्युत्तर राज्यशास्त्र विभाग प्रमुख. देगलूर महाविद्यालय, देगलूर.
***पत्ता :–*** देगलूर महाविद्यालय, देगलूर, ता. देगलूर, जि. नांदेड, मोबा. नं. ९४२३४३९२७६.

 **मुकुल रणभोर**

मुकुल रणभोर हे एम्. ए. इतिहास असून सनदी नोकरीच्या परीक्षेचा अभ्यास करीत आहेत.
***पत्ता :–*** २/६९, उमाशंकर सोसा. महेश सोसायटीच्या मागे, बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७.
Email - mukulranbhor111@gmail.com/mukulranbhor.blogspot.in
मोबाईल नं. ९०२१४२३७१७.

 **श्री. के. वनपाल**

श्री. वनपाल यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची परीक्षा देऊन मामलेदार म्हणून नोकरीस सुरुवात केली व पदोन्नती मिळवत ते महसूल खात्याच्या सचिव पदावरून निवृत्त झाले. शेती, शेतकरी व त्यांचे अर्थकारण याची त्यांना तृणमूल स्तरावरून माहिती आहे.
**पत्ता :-** अ-८, रे-व्हेन्यू को. ऑ. हाऊसिंग सोसायटी, गणेशखिंड रस्ता, आय्-सी-एस् कॉलनी. पुणे ४११ ००७.
दूरध्वनी - ०२०-२५५३२१४३, भ्रमणध्वनी : ९९२२५०१४९६४.

 **श्री. अरविंद हसमनीस**

कॉमर्सचा पदव्युत्तर, युनायटेड वेस्टर्न बँकेत व्यवस्थापक, साहित्याची आवड, दोन कवितासंग्रह प्रकाशित.
***पत्ता :–*** १०१, सरस्वती संकुल, १९२/१९८ यादोगोपाळ पेठ, कला वाणिज्य कॉलेज समोर, सातारा. पिन - ४१५ ००२. भ्रमणध्वनी : ९८८१४४७२२८.

 **ॲड. जीवन आनंदगांवकर**

सेवानिवृत्त जिल्हा व सत्रन्यायाधीश, कवितासंग्रह १०, १ इंग्रजी कविता संग्रह, एकांकीका व कथा अशी १५ पुस्तके प्रसिद्ध. ॲकॅडमी ऑफ बेंगॉली पोएट्री या संस्थेचा नॅशनल ॲकॅडमी ॲवॉर्ड मिळाले.
***पत्ता :–*** वसुधा, सी–२०३, डीएसके विश्व, धायरी, पुणे - ४११ ०४१. भ्रमणध्वनी : ९८५०५०७६०२.

अनुक्रमणिका








# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६८ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता'कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना मनवभारतफच्या संपादकांना द्यावी.

४. मनवभारतफमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत'मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

अनुक्रमणिका

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.







अनुक्रमणिका